# आ रा ध ना

( कवितासंग्रह )

वामन नारायण देशपांडे

सुविचार प्रकाशन मंडळ, लिमिटेड

शके १८५९) नागपूर (सन १९३८

किंमत सव्वा रुपया

# प्रकाशकांचे दोन शब्द

प्रस्तुत काव्यसंग्रह महाकवि भवभूति याच्या स्मरणतिथीस, म्हणजे ता. २८ फेब्रुवारी रोजीं, प्रसिद्ध होण्याचें प्रथम ठरलें होतें. कांही अनिवार्य अडचणींमुळे प्रसिद्धीची ती तारीख साधली नाही. या विलंबामुळें ग्रंथकर्त्यांची जी गैरसोय झाली असेल, तिजबद्दल आम्ही त्यांची मन:पूर्वक क्षमा मागतों.

महिनाभर विलंब लागला तरी भवभूतीसारख्याच दुसऱ्या एका अमरकीर्ति वाग्वीराच्या (चिपळूणकरांच्या) पुण्यतिथीच्या दिवशीं हा काव्यसंग्रह प्रसिद्ध करतां येत आहे, ही भाग्याची गोष्ट होय. त्या पुण्यात्म्याच्या कृपेने प्रस्तुत काव्यसंग्रह वाचकांच्या कृपेस पात्र होऊन महाराष्ट्र वाङ्मयक्षेत्रांत आपल्या योग्यतेस अनुरूप असें स्थान संपादन करण्यास समर्थन होईल, असा भरवसा वाटतो.

कवींच्या कल्पनेस अनुसरून वेष्टनावरील चित्र काढून दिल्याबद्दल श्री. ना. रा. वकील यांचे आम्ही आभारी आहों.

चिपळूणकर पुण्यतिथि<br>
फाल्गुन व॥ १३ शके १८५९

प्रकाशक

# आभारप्रदर्शन

१. सुविचार प्रकाशन मंडळाने माझ्या कवितेचा हा प्रथम संग्रह जितक्या आपुलकीने प्रकाशनार्थ मागितला, तितक्याच आपुलकीने तो प्रकाशितहि केला, याबद्दल त्याच्या चालकांचा मी आभारी आहें.

२. हा संग्रह स्वतंत्र रीत्या प्रसिद्ध करण्याचा पहिला विचार होता. व त्याच वेळीं त्याला **प्रो. श्री. ना. बनहट्टी** यांची प्रस्तावना घेण्याचेंहि निश्चित झालें होतें. पुढे मंडळाने संग्रह प्रकाशनार्थ घेतला असला तथापि त्यामुळे हा निश्चय बदलण्याचें कांहीच प्रयोजन दिसलें नाही. कारण अवैतनिक सल्लागार या नात्याने प्रोफेसर साहेबांचा मंडळाशीं अप्रत्यक्ष संबंध असला तरी साहित्यविवेचक, विशेषतः काव्यपरीक्षक, या नात्याने त्यांची जी भूमिका आहे तिला कांहीच बाध येत नाही. आणि ती भूमिका मुद्दाम दृष्टीआड करण्याचें मला कांहीच कारण नाही.

प्रस्तावनेबद्दल प्रो० बनहट्टी यांचा मी अत्यंत ऋणी आहें. तिला मी कसलेंहि विशेषण लावणें उक्त ठरणार नाही.

३. चित्रकार रा. ना. रा. वकील यांनी सुन्दर कव्हरचित्र काढून दिल्याबद्दल त्यांचेहि मी मनःपूर्वक आभार मानितों. संग्रहाबाबत फार त्रास घेतल्याबद्दल एका मित्राचे त्याच्या मनाईमुळे जाहिर आभार मानितां येत नाहीत, याचा खेद वाटतो.

वा. ना. देशपांडे

# अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# धन्यतेची थाप*

जन्मांत कवितेची ओळही ज्याने लिहिली नाही आणि पुढेही जो लिहील असा संभव नाही, अशा मला वामनरावांनी आपल्या काव्यग्रंथास प्रस्तावना लिहिण्यास कां सांगावें, याचा उमज मला पडेना. तथापि त्यांच्या हेतूचा तलास लावण्यासाठी मनोविश्लेषणाचे प्रयोग करण्याच्या भरीस न पडतां मी त्यांच्या इच्छेस मोठ्या आनंदाने रुकार दिला. त्यांचा हेतु कोणचाही असो, माझा हेतु मात्र स्वार्थी होता. तो त्यांना लिहून कळविण्यासही मी कमी केलें नाही.

"प्रस्तावना म्हणजे कांही अभिप्राय नव्हे, एका मित्राने दुसऱ्याच्या पाठीवर मारलेली **धन्यतेची** ती **थाप** आहे, इतकेंच मी समजतों आणि आपलें काव्य मराठी भाषेंत चिरंतन राहणार ही माझी खात्री असल्यामुळे आपल्या काव्याच्या गाड्याबरोबर माझ्या प्रस्तावनेच्या नळ्यालाही चिरंतनत्वाची यात्रा घडणार ही लालूच मला आहेच. तेव्हा आपली आग्रहाची इच्छा असेल तर मी प्रस्तावना आनंदाने लिहीन." याप्रमाणे त्यांच्या मागणीस होकार दर्शवितांना मी लिहिलें होतें. आणि या लालचीस वश होऊन प्रस्तावना लिहिण्याची ही संधि मी साधीत आहें, हें सर्वांसमक्ष कबूल करण्यांतही मला संकोच वाटत नाही.

दुसरें असें की, माझ्यासारख्याने प्रस्तावना लिहिण्यांत रसिकाच्या भूमिकेचा एक प्रकारचा गौरव आहे. एका कवीने दुसऱ्या कवीच्या काव्यसंग्रहास प्रस्तावना लिहिणें, यांत विशेष नाही. शेंकडा नव्वद ठिकाणी तसेंच घडत असेल. उरलेल्या दहांपैकी नऊ उदाहरणांमध्ये, प्रस्तावना लिहिणारे प्रत्यक्ष कवि जरी नसले तरी ललितलेखक असलेले बहुधा आढळतील. माझ्यासारखा, शारदेच्या लीलाविलोकनाचा विषय अद्याप तरी न झालेला इसम काव्यग्रंथाचें आवाहन करण्याकरितां शारदेच्या मयूरसिंहासनासमोर पाचारिला जावा, हा योगायोग अपूर्वच म्हणावा लागेल. तो

---

*ही थाप लेखकाच्या पाठीवर मारलेली आहे, तेव्हा ती लोणकढी असेल अशी भीति बाळगण्याचें कारण नाही.

जितका अपूर्व तितकाच अभीष्ट होय असें मला वाटत असल्यामुळे मी तो वाया जाऊं दिला नाही.

अभीष्ट वाटण्याचें कारण असें, की सहृदय वाचक हाच काव्याचा खरा परीक्षक होय; काव्य बोलण्याचा अधिकार जसा कवीचा त्याप्रमाणें काव्याविषयीं बोलण्याचा अधिकार खरा सहृदयाचाच होय; अशी माझी तरी समजूत आहे. आणि सहृदयांच्या पंक्तींत, शेवटचें कां होईना, स्थान मला अवश्य मिळेल अशी माझी दुसरीही एक समजूत असल्यामुळे मी हें प्रस्तावनालेखाचें काम स्वतःस योग्य म्हणून आनंदाने पतकरिलें.

सहृदयांची बूज आपल्या समाजांत चांगली राखली जात नाही आणि सहृदयतेचा विकास आपल्याकडे चांगलासा होत नाही, ही मोठी चिंता करण्याजोगी गोष्ट आहे. काव्यें रचणारे लोक आपल्या समाजांत जितके आढळतील तितके काव्यें वाचणारे आढळणार नाहीत, असें खास वाटतें. काव्यगायन ऐकणारे पुष्कळ आढळतील, परंतु त्यांपैकी 'काव्य' आस्वादणारे किती निघतील आणि 'गायन' ऐकणारे किती निघतील, याचा पृथक अंदाज करणें शक्य नसल्यामुळे, त्यांचा प्रश्न विचारांतून वगळलेलाच बरा. सहृदयता ही केवळ काव्य आस्वादण्यांतच नाही, सर्व व्यवहारांत तिची आवश्यकता असते व तिचा अभाव जाणवतो. प्रेक्षणीय स्थळें पाहण्यासाठी प्रवासास निघालेल्या एखाद्या टोळीची अवस्था पहा. त्यांतील बहुसंख्य लोकांचें लक्ष पाहण्याच्या स्थळांपेक्षा बांधून आणलेल्या शिदोरीकडेच अधिक असेल. बाकी उरलेल्यांपैकी बहुतेक, अमुक एक ठिकाण आपण पाहिलें अशी आपल्या मनाची समजूत करतां यावी व गावीं परत गेल्यावर लोकांस कांही खाणाखुणा सांगतां याव्या, या हेतूने कांही जुजबी निरीक्षण करण्यांत समाधान मानत असतील. काव्य वाचणारे लोक त्याच्या उपांगांकडेच लक्ष देतील, त्याच्या अंतरंगाकडे जाण्याची प्रवृत्ति एखाद्याचीच आढळेल.

सहृदयतेबद्दल इतका प्रपंच करण्याचें विशेष कारण आहे. येथे तिची अत्यंत आवश्यकता आहे, ही गोष्ट वाचकांच्या नजरेस मला आणून द्यावयाची आहे. सामान्यतः काव्याच्या आस्वादास सहृदयता ही पाहिजेच. परंतु श्री. वामनराव देशपांडे यांच्या कवितेचा खरा आस्वाद

घेण्यास सहृदयतेची विशेष प्रमाणांत जरूरी आहे; कांही एका वरच्या पातळीवरील सुसंस्कृत व संयमित अशा सहृदयतेलाच त्यांच्या कवितेचें सौरस्य पूर्णपणें आकलन होईल. अठरापगड लोकांच्या अफाट समुदायाकडून टाळ्या व वाहवा मिळवील अशा तऱ्हेचें त्यांचें काव्य नाही, असें म्हटल्यास त्यांच्या काव्यास कमी लेखल्याचा किंवा इतर कवींच्या काव्याचा अधिक्षेप केल्याचा आरोप मजवर येऊं नये.

शिक्षणाने व संस्काराने ज्यांच्या अंतःकरणवृत्ति उन्नत झालेल्या आहेत अशा सहृदयांच्या मानसरंगावर त्यांचें काव्य बहारीचें रंगेल, आणि तेंच त्याचें खरें साफल्य आहे.

पसतीस चाळीस कवितांचा हा काव्यसंग्रह अगदी लहानसाच आहे. परंतु कल्पनारम्यता, भावपेशलता आणि तत्त्वगंभीरता या तीन्ही गुणांचा इतक्या प्रमाणांत एकत्र संनिवेश असलेला दुसरा काव्यसंग्रह अलीकडे क्वचितच प्रसिद्ध झाला असेल, असें म्हणण्यास मला हरकत वाटत नाही. या तीन्ही गुणांचा याच क्रमाने उल्लेख करण्यांतही एक तात्पर्य आहे. तें हेंच की साधारणतः याच क्रमाने हे तीनही गुण या काव्यसंग्रहांत प्रकट झालेले आढळतात; आणि असेंही म्हटलें असतां चालेल की स्थूल मानाने ते कवीच्या मनोविकासाचाही क्रम दाखवितात. कवि प्रथम कल्पनाविहारांत दंग असलेला आढळतो, पुढे तो स्वतःच्या अनुभवांतून स्फुरलेल्या भावनांचा आविष्कार, कोठे प्रकट रीतीने तर कोठे आडपडद्याने, करतांना आढळतो आणि अखेरीस कांही एका समाहित अवस्थेप्रत प्राप्त होऊन तो अन्तिम तत्त्वांचें व उदार आदर्शांचें प्रणयन करूं लागलेला दिसतो. ही शेवटची पायरी तो पूर्णपणें चढून गेला आहे असें निखालस म्हणतां येणार नाही. परंतु इतक्या अल्प काळांत मानसिक विकासाचा इतका मोठा टप्पा त्याने गाठला आहे, ही गोष्ट देखील कांही सामान्य नाही.

कवीचें कल्पनावैभव फार मोठें आहे. त्याची मनमुराद खैरात करण्याकडेच प्रारंभीं प्रारंभीं त्याचें लक्ष असल्यास त्यांत नवल कांहीच नाही. नव्या नवतीच्या पहिल्या भरांत काव्यप्रतिभेला असे विलास

करण्याचें सुचावें, हें साहजिक होय. 'भारती', 'परिवर्तन', 'रजनी' या कवितांमध्ये वर्ण्यविषयाला नानातऱ्हेच्या मनोहर व समर्पक कल्पनांनी नटविण्याची कवीची ही हौस उत्कृष्ट रीतीने व्यक्त झाली आहे. या कल्पनाविलासांतही कवीची अभिजात सुसंस्कृतता ठिकठिकाणीं व्यक्त झालेली आढळते. पहिल्याच पानावरील वनप्रदेशांतील रात्रीचें मनोरम वर्णन पहा.

—अहा ! निशेच्या पदराखाली भूबाला घेउन
त्रिभुवनजननी तिला पाजिते निर्मल चंद्रस्तन !

यांतील कल्पनाचित्र मनोरम असलें तरी तरल कल्पनेच्या कोणत्याही कवीला तें सुचण्याजोगें आहे असें म्हणतां येईल. परंतु त्यापुढील ज्योत्स्नेच्या वर्णनांत आलेली उपमा पहा.—

जोत्स्ना फुलवी सुवर्णगिरिचें हरितपर्ण कानन
योग्याची जशि जीवकला करि परकाया चेतन !

प्राचीन विद्याकलांच्या वातावरणांत कवीचें मन मुरलेलें असल्याशिवाय त्याला सहसा ही परकायाप्रवेशाची कल्पना सुचावयाची नाही. त्याचप्रमाणें

विक्षेप करुन शाखा-करिं, पदिं अहिनूपुर बांधुन
नृत्य कराया सज्ज जाहले काय विटप चंदन !

येथेही नूपुर बांधून हस्तविक्षेप करून नृत्य करण्याची कल्पना कवीच्या कलाभिज्ञतेची द्योतक आहे. अशाच आशयाची कल्पना बाण कवीच्या कादंबरींत आली असल्याचें स्मरतें. त्यावरून येथील उत्प्रेक्षा सुचली असल्यास कवीच्या अभिजात सुसंस्कृततेचा तो आणखी पुरावा मानावा लागेल. पुढे दुसऱ्या पानावरील पंक्ति १७ ते २४ पर्यंतचें वर्णन असेंच कवीच्या कल्पनाचातुरीचें व अभिजात सुसंस्कृततेचें दर्शक आहे.

गांभीर्य पळे, भारतिवदनीं स्मित वेगें धावलें
वृत्र मरुनिया जलौघ जैसे ते झाले मोकळे! (पृ.५ पं. ८७,८८)

येथील उपमा वेदांतील वर्णनावरून घेतली आहे. वामनरावांच्या काव्यांतील अशा तऱ्हेच्या सर्व उपमा समर्पक व अर्थाला मनोहर रीतीने पुष्ट करणाऱ्या असतात; केवळ पांडित्यप्रदर्शक अतएव कृत्रिम भासत नाहीत, हें त्यांत आणखी लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

बहुश्रुतपणाच्या निदर्शक अशा उपमा उत्प्रेक्षा 'कपटवेष' या नाट्यकाव्यांत विपुलत्वाने आल्या आहेत. त्या काव्यांतील प्राचीनत्वाचें आणि संस्कृतत्वाचें वातावरण त्यांच्या योगाने फारच खुललें आहे, याविषयीं कोणीही रसिक साक्ष देईल.

'भारती' या कल्पनारम्य खंडकाव्यामध्ये रूपकाची योजना कवीने मर्यादित स्वरूपांत केली आहे. भारती ही वाङ्मयाची अधिष्ठात्री देवता, नऊ बालिका म्हणजे नव रस आणि गणदास म्हणजे बळजबरीने रचना करणारा धीटपाठ कवि, हें तर उघड दिसतें. परंतु रूपकास आधारभूत असलेला हा विषय काव्याच्या सर्व वर्णनांत अनुस्यूत करण्याचा अट्टाहास न करितां वनदेवतेच्या लीलाविलासादिकांचा वर्ण्य विषय कवीने मोकळे-पणाने वर्णन केला आहे. नांवाच्या योजनेखेरीज रूपकाची छटा दाखविणारें काव्यांत फारसें कांहीच दिसून येत नाही. रूपकाची योजना करितांना कवीने दाखविलेला हा संयम वाखाणण्याजोगा आहे.

कवीच्या कल्पनाशक्तीची बहार 'रजनी' या कवितेंत आणखी एक-वार दिसून येते. त्यापुढें मात्र काल्पनाविलासास वाहिलेली अशी कविता कवीने रचलेली दिसून येत नाही. कवीच्या भावना त्याच्या काव्यरचने-मध्ये डोकावूं लागतात आणि यापुढे कल्पनाचमत्कृति ही भावनाविष्कारास सहायभूत म्हणूनच उचित स्थानीं विलसतांना दिसते.

कवीचें जीवन विपरीत परिस्थितीने भाराक्रान्त झालेलें आहे. स्वतःच्या अंगचे उच्च गुण दुर्दैवाच्या आघातामुळे दडपले गेल्याकारणाने हीन अवस्थेंत त्यास खितपत पडावें लागलें आहे. अशा स्थितींत निरनिराळीं प्रतीकें योजून, या प्रतीकांस निमित्त करून, स्वस्थितीमुळे स्फुरलेले आर्त उद्गार त्याने काढावे, हें अगदी स्वाभाविक, किंबहुना अपरिहार्य आहे. कवीने रचलेलीं हीं भावगीतें प्रतीकात्मक असून आत्मपर आहेत. त्यांत व्यक्त झालेली आर्तता व दैवाहतता अलीक (मुळांत नसतांना काव्याकरितां मुद्दाम पांघरलेली) आहे, असें पाहिजे तर मानावें. वानवासिक (pastoral) गीतें लिहिणाऱ्या युरोपीय कवींप्रमाणे एखाद्या कवीने सर्वच काव्यविषय व त्यांतील भावना कृत्रिम

रीतीने स्वीकारून खऱ्याप्रमाणे वर्णिल्या असणें अशक्य नाही. परंतु वामनरावजींच्या गीतांतील आत्मपरता व आर्तता इतकी सहज व मुलायम आहे की ती आभासरूपी असेल असें मानणें कोणासही जडच जाईल. कवीला ज्योत्स्नेचा लाभ तर होत नाहीच, परंतु साध्या चांदणीचें दर्शनही त्यास दुर्लभ झालें आहे (पृ. १४); उच्चतर मानसिक लाभ हे तर त्यास संधीच्या अभावीं खपुष्पाप्रमाणें झाले आहेत (पृ. १६); त्याचा देह भंगलेल्या घटाप्रमाणें किंवा क्षीण धाग्याचे टाके घातलेल्या जीर्ण पटाप्रमाणें झाला आहे (पृ. ४६); त्याचें जीवनरूपी मंदिर शून्य आहे, ध्येयरूपी देवमूर्तीचा त्यास आढळ होत नाही (पृ.४७); ती देवमूर्ति लुटारूंनी पळविल्याकारणाने तिची पूजा करण्याचा अवसरही त्यास मिळालेला नाही (पृ. ५२); अशा स्थितींत ह्या भारभूत आयुष्याचा

दिवस मावळू दे येऊं दे काळरात (पृ. ५६)

अशी विनवणी तो आपल्या प्रियसख्याला (मृत्यूला) करीत आहे. ही विनवणी हृदयभेदक असली तरी कवीने आपल्या अवस्थेचें जें करुण दारुण वर्णन केलें आहे तें पाहतां ती आश्चर्यकारक खास वाटत नाही.

ही आर्ततेची व भग्नतेची भावना आळविणारीं गीतें 'ढगाआडील चांदणी', 'वेड ग खपुष्पाचें', 'माझिया जिवा,' 'आवाहन', 'अंगाई', 'पूजिका', 'शीळ', 'कंटकमाला' हीं होत. आत्मपर करुण भावगीतांचे सर्वांगसुन्दर नमुने म्हणून मराठी वाङमयांत हीं गीतें चिरकाल स्मरलीं जातील यांत मला शंका नाही.

या गीतांतून नुसती आर्तताच निनादित होत असती तर मी त्यांस इतकें उच्च लेखलें नसतें. आर्ततेबरोबरच धीरता, शुचिता, उदात्तता यांचाही सूर या गीतांमध्ये स्पष्ट उमटलेला दिसून येतो; आणि या संवादी सुरांच्या मेळाने त्या गीतांचें सौन्दर्य दुणावलें आहे असेंही आपल्या अनुभवास येतें. कवीची आर्तता ही, आपल्या आंगिक योग्यतेनुरूप आपणास संपत्ति व पार्थिव सुखोपभोग मिळत नाहीत, अशा समजुतीमुळे उत्पन्न झालेली राजस आर्तता नाही; इतर लोक आपला अवमान व तिरस्कार करतात म्हणून त्यांजवर चिडणारी व जळफळणारी तामस

आर्तता तर नाहीच नाही; आपणाला आपल्या ध्येयदेवतेचें पूजन करावयास मिळत नाही, आपल्या दुर्भाग्यामुळे प्राप्त झालेल्या कंटकमालेला वैजयंती म्हणून मानून तिचा स्वीकार करण्याइतकी धीरोदात्तता आपल्या अंगीं बाणली नाही (पृ. ५९), यामुळे वाटणारी ही सात्त्विक आर्तता आहे. तिचें भव्योदात्त स्वरूप खऱ्या सहृदयाच्या मनाची कायमची पकड घेतल्याखेरीज राहणार नाही. कांही थोडे उतारे दाखल करून या आर्ततेचें सात्त्विक व भव्योदात्त स्वरूप वाचकांस पटवावें असा मोह मला फार होतो; परंतु सर्व काव्यसंग्रह वाचकांच्या पुढेच असल्यामुळे व त्याचा आस्वाद वाचकांनी शक्य तितका अधिक घ्यावा असा माझा हेतु असल्यामुळे तो मोह येथे कष्टानेच आवरावा लागत आहे.

परंतु आर्तता कितीही सात्त्विक व भव्य असली तरी ती कांही जीवनाचें ध्येय होऊं शकत नाही. सर्व मानसिक व्यापारांचा लय कुरकुरणें, चडफडणें, विव्हळणें, इत्यादींमध्येच व्हावयाला लागणें, आणि असल्या तळमळत्या अवस्थेंतच मषगुल होऊन राहण्याचा मनाला छंद जडणें, हें एक प्रकारच्या विकृततेचें लक्षण होय. आपल्याला आलेली दुरवस्था यद्यपि परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळे, समाजाच्या निर्घृणतेमुळे अगर व्यक्तींच्या दुष्टाव्यामुळे प्राप्त झालेली असली तरी तीच ती दुर्दैवाची कहाणी एकसारखी उगाळीत बसणें—व असें करण्यांत एक प्रकारचा संतोष अनुभवणें—हें कमकुवतपणाचें द्योतक होय. मनुष्याच्या मानसिक प्रवासांतला आर्तता हा एक टप्पा होऊं शकेल, तो कांही अखेरचा मुक्काम होऊं शकत नाही. त्याचें मन आर्ततेंतून उत्क्रान्त होऊन समाहित अवस्थेप्रत जाऊन पोचलें तर त्याचा जोम, सकसपणा व सात्त्विकपणा खरा. सात आठ वर्षांपूर्वी दुसऱ्या एका विख्यात कवीच्या काव्याविषयीं लिहितांना अशाच तऱ्हेची विचारसरणी मी प्रदर्शित केली होती व त्या कवीच्या दिलदारपणाची खूण ही की त्याने मी केलेली मनोवृत्तीची मीमांसा यथार्थ असल्याबद्दल ग्वाही दिली होती. 'वासना व आकांक्षा कायम असून त्या तृप्त करण्याचीं द्वारें न उपलब्ध झाल्यामुळे जी एक निराशा किंवा जो वैताग उत्पन्न होतो त्यापासून मनःशांति कांही

लाभूं शकत नाही. ज्यापासून मनाला चिरशांति व समाधान लाभूं शकेल असें कांही तरी उदात्त चित्र मनुष्याच्या मनापुढे ठेवणें हें तर काव्याचें महत्कार्य होय !' तेव्हा, मानसिक आर्ततेंतून पार पडून कवि समाहित, स्थिरप्रशांत अवस्थेंत गेल्याचें आणि त्या अवस्थेंत उच्चतम आनंदाचें स्थान त्याला गवसलें असल्याचें जर त्याच्या उद्‌गारांवरून दिसून येत असेल, तर त्याची योग्यता कांही आगळीच मानावी लागेल, हें उघड आहे.

धन्यता वाटण्याजोगी गोष्ट ही की अशा समाहित, तत्त्वदर्शी अवस्थेप्रत जाण्याच्या दिशेने कविमनाचा विकास होत असल्याची खूण वामनरावजींच्या काव्यांत आपल्याला पटते. आर्ततेंतून उत्क्रांत होऊन पुढे विकसित होण्याच्या दोन दिशा वामनरावजींच्या कविमनाने अवलंबिलेल्या दिसतात. आजवर शेंकडो भक्तांनी आणि साधकांनी अवलंबिलेली स्वात्मार्पणाची दिशा ही यांपैकी एक होय. 'ओसाड या जगीं इच्छित न मिळे कांही' अशी स्थिति झाली म्हणजे 'म्हणुनी तुझे पायीं भिक्षांदेही' करण्यास कवि सज्ज होतो, हें आधुनिक कवींच्या उदाहरणांवरूनही आपणास दिसून येतेंच. हीच दिशा, परंतु अधिक तत्त्वदर्शी पद्धतीनें वामनरावजींच्या मनाने अवलंबिली आहे.

'विश्व जयें निर्मिलें' त्या जगदात्म्याला आत्मसमर्पण करणें हेंच साध्य, जें आजवर अनेक महात्म्यांनी मानिलें, तें त्यांच्या 'तोच गीत ऐकितो' (पृ. ८६) या कवनांत परिस्फुट झालें आहे. 'मिणमिण पणती' (पृ. ६३) या कवितेंत दिव्य जीवनाविषयींची कविमनाची असोशी हृदयंगम रीतीने व्यक्त झाली आहे. 'दिव्य भवितव्य' (पृ. १०९) या भव्य कवितेंत चित्सरितेच्या अफाट अथांग विस्ताराला तरून जाण्यास कवि 'प्रज्ञेची जगड्व्याळ नौका' घेऊन सज्ज होऊं पहात आहे. अशा तऱ्हेने स्वात्मार्पण, दिव्य जीवन, प्रज्ञेचें उत्तुंग आक्रमण—इत्यादि स्वरूपाचे ज्ञाताच्या कुंपणापलीकडील अवकाशाचे पडसाद कवीच्या कानांत घुमूं लागले आहेत आणि या दिशेने वैयक्तिक जीवनाच्या आर्ततेवर विजय मिळविण्याच्या मार्गास तो लागला आहे, असें त्याच्या उद्‌गारांवरून दिसून येतें.

दुसरी विकासाची दिशा सामाजिक ध्येयदर्शनाची होय. वैयक्तिक मनोरथ, आकांक्षा, प्रगति यांच्या बाबतींत जो विफल ठरला, तो आपल्या बांधवांच्याकरितां प्रेम व सहानुभूति यांचें दान करून समाज-कल्याणाच्या प्रयत्नांत आपलें समाधान पाहूं इच्छितो. आपलें व्यक्तित्व स्वबांधवांच्या, स्वसमाजाच्या, स्वदेशाच्या व्यापक व्यक्तित्वांत लीन करून ह्या दिशेने एक प्रकारचें स्वात्मार्पण करण्याचा हा जीवित-साफल्याचा मार्ग आजपर्यंत किती तरी धन्य पुरुषांनी अवलंबिलेला आहे. कविमनासही तो हृद्य वाटल्यास त्यांत कांही आश्चर्य वाटावयास नको. आपल्या कवीचें मन या दिशेनेही विकास पावत आहे, हें प्रस्तुत संग्रहांतील शेवटच्या शेवटच्या कांही कवितांवरून दिसून येतें. 'प्रेमाचा वाटा' (पृ. ६७) या कवितेंत कवि सखीला अर्पिलेल्या स्वप्रेमाचा, स्वकर्तव्याचा, किंबहुना स्वप्राणांचा वाटा थोडा बाजूस काढून ठेवून तो दीन जनांच्या करितां अर्पण करूं इच्छितो. समष्टीसाठी स्वात्मार्पण करण्याचें हें ध्येय 'देवमान्य' (पृ. ८९) या कवितेंत परोक्ष (objective) रीतीने, परंतु सुस्पष्टपणें अभिव्यक्त झालें आहे. 'मनीषा' (पृ. १०५), 'बुद्धाच्या अस्थींस' (पृ. १०६) या कवितांमध्ये याच ध्येयाचे पडसाद निरनिराळ्या रीतींनी उठले आहेत. परंतु या ध्येयाचें तत्त्वकथन प्रत्यक्ष रीतीने आणि सुमनोहर शैलीनें केलेलें 'स्वप्नमंदिर' (पृ. १११) या कवितेंत आढळेल. या रम्योदात्त काव्यसंग्रहास कळस म्हणून ही साधी परंतु उदात्त आशयाची कविता उत्कृष्ट रीतीने शोभते.

समष्टिकल्याणाचें कवीचें हें ध्येय स्वसमाजापुरतें किंवा स्वराष्ट्रापुरतें मर्यादित नाही. अर्थात् कडवी व आकुंचित राष्ट्रीयता त्यांत दृग्गोचर होत नाही. देशाभिमान या शब्दाने जी भावना द्योतित केली जाते ती व्यक्त करणारी कविता या संग्रहांत एकच आहे. ती 'गाऊं कसें तरी ?' (पृ. १८) ही असून ती काव्यसंग्रहाच्या प्रारंभींच आलेली आहे. तिच्यांत अर्थातच मायभूमीच्या पारतंत्र्याबद्दल वाटणारी खंती व्यक्त केली आहे. पुढे अखेरी अखेरीस समष्टिकल्याणाचें जें ध्येय व्यक्त झालें आहे त्याशीं या कवितेंतील भावनेचा विरोध नसला तरी त्यांत व यांत भिन्नता आहे ही मात्र गोष्ट खरी. 'देवमान्य' या कवितेंत व्यक्त होणारें ध्येय दीनोद्ध-

रणाचें आहे, तर 'मनीषा,' 'बुद्धाच्या अस्थींस,' 'स्वप्नमंदिर' या कवितांत प्रतिपादिलेलें ध्येय निर्वैरतेचें, विश्वशांतीचें आहे. 'स्वप्नमंदिरां'त **श्रमलक्ष्मी**ला नव्या युगाची नवीन देवता म्हटलें असून फावडें व विळा या तिच्या प्रतीकांचा गौरव केला आहे. श्रमलक्ष्मीच्या आराधनेने विश्वशांतीचा उदय होणार असल्याचा यथार्थ विश्वास तेथे प्रकट केला आहे. या तीन्ही चारी कवितांचा सूर साम्यवादाशीं बराच जुळता आहे. परंतु त्यापेक्षाही तो गांधीवादाशीं अधिक जुळता आहे, हें, वामनरावजींना गैर अगर गौण वाटत नसेल तर, सांगण्याची मी परवानगी घेतों.

प्रस्तुत काव्यसंग्रहाचें स्वरूप मला जसें भासलें तसें साधारणपणें येथवर वर्णन केलें आहे. वामनरावजींचा मला आग्रह फार, की "तुम्ही प्रस्तावनेंत माझ्या काव्यांतील दोष दाखवा; कांही तरी दोषांचा उल्लेख तुम्ही केलाच पाहिजे." ही समस्या मोठी बिकट होती. मी त्यांस सांगितलें की "चांगलें आणि वाईट, गुण आणि दोष—असें रेखीव पृथक्करण करणें आणि तदनुसार शेऱ्यांची खैरात करणें हें माझ्या काव्यविवेचन-शास्त्रांत नीटसें बसत नाही. माझ्या दृष्टीने काव्यविवेचन म्हणजे मुख्य-तया अंतरंगशोधन होय. तें मी यथामति करणार आहें." तथापि अंतरंग-शोधनाबरोबरच 'व्यक्तीकरणमीमांसा' हेंही काव्यविवेचनाचें महत्त्वाचें अंग आहे, यांत कांही शंका नाही. आणि हें करीत असतांनाच उत्तम मध्यम, अधम इत्यादि प्रती ठरवून त्याप्रमाणे शेरे देण्याचा प्रसंग उद्‌भवतो. व्यक्तीकरणाच्या पुष्कळच तऱ्हा वामनरावजींना चांगल्या साधल्या आहेत. कल्पनांची चमत्कृतिजनक कसरत आणि भावनांचा संयमित, आणि म्हणूनच अधिक हृद्य वाटणारा, आविष्कार करण्याचें त्यांचें कौशल्य श्रेष्ठ कलाचतुरास साजेसें आहे. प्रतीकात्मक वर्णनशैलीमध्ये तर त्यांचा हातखंडा आहे. त्याचप्रमाणे वृत्तांचे आणि वर्णनप्रकारांचे अनेक अभिनव प्रयोग त्यांनी केले आहेत, त्यांचा थोडासा उल्लेख मी पुढे करणारच आहें. परंतु एक गोष्ट मात्र त्यांस नीट साधली नाही, असें—त्यांचें समाधान करण्याकरितां—पाहिजे तर म्हणतां येईल. ऐतिहासिक वीरवर्णनात्मक कवन करण्याचा प्रयत्न त्यांनी 'सोहागरात' (पृ. ७६)

या कवितेंत एकदा केलेला दिसतो, तो तितकासा यशस्वी झालेला नाही. ऐतिहासिक व्यक्तींची वीरता काव्यांत ग्रथित करण्यास जें ओज, जो आवेश व जो चटकदारपणा लागतो, त्याची वाण वामनरावजींच्या वर्णन-शैलींत भासमान होते. विनायक, काटदरे किंवा तिवारी–यांनी ऐतिहासिक कवनांची शैली आपापल्या परीने ज्या उत्कर्षावस्थेप्रत नेली आहे, तिच्यापुढे वामनरावजींचें हें एकच कवन–त्याचा विषय उत्कृष्ट निवडला असला तरी–बरेंच फिकें पडल्यासारखें वाटतें.

परंतु वामनरावजींनी व्यक्तीकरणाच्या अनेक प्रकारांमध्ये मिळविलेल्या साफल्याच्या मानाने ही असफलता कांहीच नाही. काव्यरचनेच्या क्षेत्रांत त्यांनी केलेल्या अनेक अभिनव प्रयोगांकडे काव्यप्रेमी सहृदयांचें जावें, तितकें लक्ष अद्याप गेलें नसलें तरी त्याचें महत्त्व व अपूर्वत्व निर्विवाद आहे. वामनरावजींची प्रतिभा जितकी स्फुरणशालिनी आहे तितकीच त्यांची प्रसिद्धिविमुखता सर्वातिशायिनी असल्यामुळे त्यांनी काढलेल्या अभिनव प्रकारांचा गाजावाजा मुळीच झालेला नाही. परंतु खरें पाहिलें तर वृत्तरचना आणि वर्णनरीति यांमध्ये इतक्या मोठ्या प्रमाणावर अभिनव प्रकारांचा अवलंब करणारा प्रतिभावान कवि केशवसुतांनंतर वामनरावजींच्या खेरीज दुसरा क्वचित्‌च झाला असेल, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. मुक्तछन्दाची योजना व प्रचार करण्याच्या श्रेयांत श्री. आत्मारामपंत देशपांडे यांजबरोबरच वामनरावजींचा वाटाही मोठा आहे. मुक्तछन्दाचें बिरुद अधिकृत रीत्या धारण करणाऱ्या 'विश्वोत्पत्ति', 'अनलज्वाला,' 'पऱ्यांची नगरी' इत्यादि ज्या कविता आहेत, त्यांखेरीज इतर आणखी कित्येक कविता जवळ जवळ मुक्तछन्दांतच रचलेल्या आहेतशा भासतात. किंबहुना अभिनव वृत्तयोजना हें त्यांच्या काव्याचें एक मोठें लक्षण म्हणून मानल्यास सहज चालेल. मुक्तछन्दाचें स्वरूप, त्याचे प्रकार आणि त्याची इष्टानिष्टता, यांच्या वादांत पडण्याची येथें गरज नाही. वामनरावजींच्या एकंदर सर्वच कवितांच्या वृत्तांची योजना समर्पक, विषयाच्या उठावास अनुकूल व चित्ताकर्षक झाली आहे, एवढा माझा अभिप्राय येथे नमूद करून ठेवणें बस होईल.

तथापि अभिनव वृत्तयोजनेपेक्षाही नाटचकाव्याचा जो प्रकार या काव्यसंग्रहांत समाविष्ट केला आहे त्याचें महत्त्व व अभिनवत्व विशेष आहे असें मला वाटतें. नाटचकाव्यामध्ये नाटचही पाहिजे आणि काव्यही पाहिजे. अर्थात् साध्या नाटचापेक्षा अगर काव्यापेक्षा तें साधण्यास अधिक अवघड. असें असतांही वामनरावांचें 'कपटवेष' हें नाटचकाव्य अप्रतिम साधलें आहे, हा त्यांच्या कलाप्रभुत्वाचा मोठाच विजय होय. प्रथमपासून निर्माण केलेल्या गूढत्वाच्या वातावरणामुळे उत्पन्न झालेलें कुतूहल, त्यांत विभावरीवेषधारी उदयनाच्या मिस्किल भाषणांमुळे पडलेली भर, यामुळे चमत्कृतियुक्त अचंब्यामध्ये वाचक एकसारखा बुचकळचा मारीत राहतो. उदयनाचा मिस्किलपणा, कलाचातुर्य आणि परिहासप्रियता, त्याचप्रमाणे गौतमाचें गांभीर्य, विरक्ति व स्थितप्रज्ञता हीं सर्व या नाटच-काव्यांतील संभाषणांमधून उत्कृष्ट रीतीने अभिव्यक्त होतात. कवीने या काव्याच्या द्वारें एखादा गूढ संदेश सांगितला आहे की काय, हें मला सांगतां येत नाही. परंतु तें सोडून हें काव्य आहे तसेंच वाच्यार्थाने जरी घेतलें तरी त्याचें सौंदर्य लोभनीय आहे, असें म्हटल्याखेरीज राहवत नाही. 'नंदनवन मुकल्यावर' हाही लहानसाच परंतु सुन्दर चुटका आहे. या दोन्ही नाटचकाव्यांमधील संवाद म्हणून दाखविण्याची जर कांही चित्ताकर्षक पद्धत शोधून काढली तर यांचे प्रयोगही उत्कृष्ट वठतील व सुसंस्कृत प्रेक्षकांचें चित्तहरण करण्यास समर्थ होतील असा अंदाज आहे.

अधिक लिहिणें प्रस्तावनेच्या प्रयोजनास अनुरूप होणार नाही. आणि प्रस्तुत संग्रह वानगीदाखल असल्यामुळे अधिक लिहिण्याची जरूरीहो नाही. वामनरावजींच्या पुढे विपुल भविष्यकाळ आहे. त्यांची प्रतिभा विकासक्षम आहे, नवोनव उन्मेषांना जन्म देण्यास समर्थ आहे, हें या संग्रहावरून निखालसपणें प्रत्ययास येत आहे. तिच्या उन्मेषाची दुसरी कला प्रस्फुट झाली असून प्रकाशित होण्याच्या मार्गांत आहे असें म्हण-ण्यास हरकत नाही. यापुढे त्यांना काव्यरचनेसाठी अवश्य असलेली निरामयता लाभून त्यांच्या हातून महाराष्ट्र शारदेची आराधना उत्तरोत्तर अधिकाधिक अनर्घ्य अशा पूजासंभाराने व्हावी, अशी इच्छा मजप्रमाणेंच त्यांचे शेंकडो चहाते व वाचक करितील याविषयीं मला शंका नाही.

**श्री. ना. बनहट्टी**

# भारती

## रूपकात्मक खंडकाव्य

[ जाति-समुदितमदना ]

—१—

नील नभातें नक्षत्रें जीं निज तेजें उजळिती
एकाएकी स्तिमित होउनी तीं कोणा पाहती ?
—अहा ! निशेच्या पदराखाली भू-बाला घेउन
त्रिभुवन-जननी तिला पाजिते निर्मळ चंद्र-स्तन !
ज्योत्स्ना फुलवी सु-वर्णगिरिचें हरितपर्ण कानन
योग्याची जशि जीवकला करि परकाया चेतन !
ठायीं ठायीं डुलती तेथे सप्तपर्ण तरुवर
झोके घेती दोल्यावरती वनदेवी त्यांवर.
कंप चंपका सुटे, स्वेदही फुटला कलिकांमिषें
—नकळे त्याचे सात्विक भावहि जागृत झाले कसे !
विक्षेप करुन शाखा-करिं, पदिं अहि-नूपुर बांधुन
नृत्य कराया सज्ज जाहले काय विटप चंदन !
कस्तूरीमृग मालतीलताकुंजामधि बैसुन
मोह पावतो निज दयितेच्या नाभीतें हुंगुन.

उडति काजवे तमालतरुच्या घनछायेभीतरी
भिल्लकिशोरी कुणी वाकुल्या काय दाखवी तरी!
त्याच वनीं हें **भावसर** स्मित तरंगरूपें करी,
अंक-हरी त्यामधे वल्हवी बिंबमया विधु-तरी.
जळीं टाकुनी पाय कोण ही बसली सौदामिनी!
—ध्यानधारणा मुनिहि विसरतिल तिजला अवलोकुनी!
वाल्मीकीच्या सुयशासम ती धवलांगी गोजिरी,
कोमलगात्री जयदेवाची जैशी वर्णावली,
कवि-कुल-गुरुच्या कल्पनेपरी चारु मदनमंजरी,
अलंकारमंडिता ज्यापरी प्रथिता 'कादंबरी'.
क्षणीं गुणगुणे अस्फुट गाणें अपुल्याशीं रंगुनी
तन्मुखिं नेउन कान वदा तें समजुन ध्यावें कुणीं!
क्षणिं मोत्यांची माळ कौतुकें कंठींची तोडिते
जलमत्स्यांतें कवळ तयांचे नवलपरी भरविते.
क्षणीं घेउनी गंधित कुमुदें भरभरुनी अंजली
कुमुदबांधवा भावें त्यांची अर्पी अर्घ्यावली.
"या ग मुलींनो! चला"—म्हणुन ती बाहे उच्चस्वरीं,
लगबग येती **नऊ बालिका** परडया घेउन करीं.
तिजभोंती त्या मंडळ धरुनी म्हणताती वंदुन :
"परोपरीचीं फुलें आणिलीं हीं आम्हीं वेचुन—
शय्या त्यांची रचूं, मग तुम्ही व्हा राधा विरहिणी,
तापद होतिल उपचारहि हे सकळ तुम्हांलागुनी!

कुंजवनच हें विपिन, गौळणी आम्ही स्मरविव्हला,
निज विरहाचें गीत आळवूं गळयांत मिळवुन गळा!"

—२—

इतुक्यामाजीं सशब्द आला एक विशिख त्या स्थळीं
त्यामागुन ये भिल्ल—अनुसरे गदास यम ज्यापरी!
परस्परांशीं कुजबुजती त्या छद्माने हासुन :
"गडे पहा हा अम्हांकारणें 'कृष्ण'च ये धावुन!"
सावधानता भिल्लाची त्या रूपद्युतिदर्शनीं
गालांवरच्या खळींत त्यांच्या पडे पाय घसरुनी!
"खैरच झाली"—वदे—"कुणाही मम शरें न विंधिलें
खचित सांगतों, चमरीगण मीं दुरुन तुम्हां मानिलें!
गवसे ना मज सावज तरिही खेद न हो मन्मनीं,
पुण्यच फळलें—मला आतुडे श्रृंगाराची खनी!
गौर मोहने! स्त्रीसभेंत या तूं मुखरण शोभशी
अप्सराच या दासी म्हणुनी काय सवें मिरविशी?
कवणाची तूं कोण?—कासया ऐशी रानींवनीं?
तुला पाहुनी मोहुन गेलें मन माझें साजणी!"

—३—

भ्रुकुटी झाली वक्र जणू ती अलक तिचे चुंबिते
तुच्छतेप्रती दावुन देवी त्यालागीं बोलते :
"थोराची मी तनया, मजला म्हण तूं रे भारती
नऊ कुमारी सख्या माझिया रूपवती-गुणवती.

बघुनी गगनीं इंदुकला ही साधु-हृदय-निर्मला
केलि कराया त्यजुनी आलें प्रासादहि आपुला
कोठे मी, तूं कुठे ?—आपुली कैशी व्हावी तुला ?
नि:शंक तुला केवि पाहवे नजर भिडवुनी मला ?
सिकतेवरिही जेथे माझें पदपंकज उमटतें,
वसंतलक्ष्मी स्वयें प्रगटुनी त्या स्थानीं लोळते !
—क्षुद्र कुरवका हातहि माझा ओझरता लागतां
सर्वेचि त्या ये कल्पतरूचें रूपसाम्य तत्त्वता !
रसना माझी तालूलागीं सहज जरी स्पर्शिली,
घुमूं लागते माधुर्याची एकसरें बासरी !
भुलले मजला अनंत मानव—विरक्तही सन्मती—
कृपावीक्षणहि मिळुन न माझें कुढती—कढती किती !
धीट असा तूं कोण—ठेविशी प्रीतिभाव मजवरी ?
—व्यतिपातातें सांग केधवा शुभद तिथी लाभली ?"

—४—

"ऐक मानिनी ! नारीत्वाची असशी चाफेकळी,
शूर वीर मी—पुरुषगुणांची मजहि वाण कोठली ?
**गणदास** मला वदति—येथला मी स्वामी आगळा –
सांज-सकाळीं शत भिल्लांचे झडती मुजरे मला.
देखतांच मज मनीं दचकती भीषणही केसरी,
थोर थोर नृप साथ याचिती नित माझी संगरीं.
प्रसन्न चंडी मला : स्कंधिंचें रुधिर अर्पितों तिला
मांत्रिक मी—मज पिशाच्चगणही वश पुरता जाहला !

भिल्लकन्यका कैक मानसीं मजसाठी आतुर
योग्यच झालं, पुजिल्या नव्हत्या मी गौरी त्यांतिल !
ऐकुन होतों गोड नाम तव मी केव्हापासुनी
आज साधली दैवें अपुल्या भेटीची पर्वणी.
मज वरमाला घालाया हीं काय फुलें आणिलीं ?
—उटजीं जाऊं चाल माझिया, हो माझी अंतुरी !
गणगोताची भीड जरी तूं बाळगिशी अंतरीं,
टिळाच त्यांच्या रक्ताचा तुज लाविन भाळावरी !"

—५—

गांभीर्य पळे, भारति-वदनीं स्मित वेगें धावलें
वृत्र मरुनिया जलौघ जैसे ते झाले मोकळे !
–"सार्थच आहे नाम तुझें, तूं गमशी कज्जलगिरी
तमालदलरस काय चर्चिला अपुल्या देहावरी ?
शेषशिखा तूं, द्यौपुरुषाची की मुखरोमावली ?
विश्ववैष्णवा काय घवघवित कृष्ण गंध तूं तरी ?
मुळची तुझिया अंगीं होती लावण्याची द्युती,
तुझीच छाया काय बिलगली की मोहुन तीप्रती ?
श्वेतवर्ण तव विलसत होता स्फटिक-पिंडिकेपरी,
काय त्यामधे भिल्लिण कोणी की बिंबित जाहली ?
त्रिखंडांत वद मिळेल ऐशी कवण तुला भामिनी–
विळखा जी तव कर-सर्पाचा साहिल तनुलागुनी ?"

—६—

"प्रियच मला निज रंग सावळा निखंदिशी तूं जरी,
माझी मजला सखये! त्याची कळते महती पुरी :
वाजवितों मी मृदंग तेव्हा दिसतों मेघापरी
मजसन्मुख मग मुदें नाचते भ्रमें मोरमंडळी.
धरुन कितेकां मान टाकितों त्यांची मुरगाळुन
—कुणी करावी पारध त्यांची वनोवनीं हिंडुन ?
हिरव्या राइंत होतों निद्रित वैशाखीं एकदा
वैरी माझा **रसरंग** तिथे अवचित आला तदा;
सावध नच मी, सशस्त्र रिपुशीं झुंज कासया करीं ?
कर उभारुनी अतिविंदानीं ठेलों वृक्षापरी !
'वीज पडुनिया तरु वठलेला'—ऐसें मज तो गणी
"दडला कोठे?"—म्हणत परतला अधिक चिडुन तेथुनी!
सुहृदासम जो वर्ण साधितो हित माझें यापरी,
राहिल बनुनी गडे तुझी तो कायमची साउली !
प्रेमदेवता तूं माझी, मी प्रेमाचा पाइक
तडाग मी, तूं हंसी माझी हो नाजुक साजुक.
मेघराज मी कभिन्नकाळा, धवल तूं बलाकिनी
भैरवमूर्ती मी, माझी हो उटीच तूं चंदनी.
घनश्याम मी—मला आवडे तुजऐशी गोमटी
चपलेसम तूं—तुला रुचेना कसा काजळी पती ?"

—७—

हसति बालिका, हसे भारती धरुन मुखीं अंचळ
म्हणे मनाशीं, "तर्कपंडितच हा अभिनव केवळ!
अनार्य आधी, अनंगरंगें त्यांतच जडलें पिसें
मर्कटचेष्टा काय करिल हा—मर्यादा ही नसे!
येथ पातलें खेळायातें खेळ मी नवेनवे,
काळें मेलें मांजर मजला हें आलें आडवें!
अल्प यामिनी उरे; शशांकहि कलला अस्ताचलीं
इथुन सुटाया प्रेमाचें मी मिष करितें तोंवरी!"

—८—

पळापळाला गणदास मनीं अधिरावत चालला
एक एक पद पुढतीं सरुनी तत्सन्निध ठाकला—
—"मौन भारती! कशास धरिलें?—बोल, बोल मजसवें
मिठी मार, ये, मजला आता आवेग न साहवे!
तूं सुन्दर फुलझडी, घडण तव देहाची मोहन
काय बसविले तुझिया वदनीं हरिणीचे लोचन?
कवळावीशी घडिघडि वाटे तव शिरिंची नागिण—
चंदनशाखा गणुन बैसली जी तुजला बिलगुन!
ऊर तुझा कां असा थरथरे ससा जसा कातर?
—भय-लज्जेचें जाल मनांतिल हें आवर—सावर!
किती करावी तव मैतरणी! मनधरणी याहुन?
—परदारांतें खचित पळवितों आम्ही झड घालुन!"

—९—

नटनागर ती रमणी त्यातें बळेंच मुरडुन पुसे :
"सांगा आधी मजशिं द्यायचें सौख्य कोणतें कसें!"
"—आवडती तूं नार लळ्याची माझी झाल्यावरी
तुझ्या सुखाला अंतपार वद राहिल कैसा तरी ?
गुंजमाळ मी तुला घालुनी गळा तुझा सजवुन
सर्पमण्यांचीं दिव्य कुंडलें झग झग झग देइन.
कानीं तुझिया आम्रमंजरी निज हातीं खोवुन
मोरपिसांनी विचित्र नटविन तुझें केशबंधन.
नवें मधाचें पोळें आणिन तुजसाठी प्रतिदिन,
शेज तुला मी रचिन राजसे! व्याघ्रांबर पसरुन.
सफळच होइल रमणीपण तव मजसंगें नांदुन
वसशिल भुवनीं एकलीच तूं भाग्यवंत कामिन!"

—१०—

"तुजवरुनी हा जीव टाकितें मी तर ओवाळुनी,
कृष्णदेव तूं — तुझी जाहलें मी राणी रुक्मिणी !
कुरळ कुंतलीं तुझिया पदिंची धूळ पुसूं दे मला,
प्रेमाश्रूंतें ढाळुन नयनीं प्रक्षाळिन त्यांजला.
लज्जायुत मी—असतिल गालीं लोध्रसुमें उमलतीं—
वरमाळ तुला त्यांची वाटे घालावी संप्रती !
अवसेसम तूं असुनहि माझें चित्त जडे तुजवरी
—प्रियच नसे का कचकलाप हा आम्हां घनकाजळी !

कंदर्पाची सायक-लक्ष्मी मजला गणिलें जरी,
म्हणतिल लोकीं मदन-धनूचा गुण तुजला त्यापरी !”

— ११ —

कोण मोद त्या ?–उमगे त्यातें भारतिचें कैतव
करतल वाजवि, हर्षातिशयें विकट करी तांडव !
खुणाविते ती नेत्रकटाक्षीं सकळ बालिकांप्रती
आशय हेरुन तिचा, त्या त्वरें भिल्लातें वेढिती :
एक विखारी कटाक्ष अपुले फेकितसे त्यावरी,
दुजी धरितसे हात तयाचा शुंडादंडापरी,
तिजी मुरकते, चवथी वर्षी हास्यमधुच आपुला,
–नऊ जणींनी छळच तयाचा येणेंपरि मांडिला !
फेर धरुन मग तान छेडिती त्या मंजुळ मंजुळ
नाच नाचती पदन्यास निज करुन पवनचंचल !
त्या गानरवें बहरुन आले मेरुवृक्ष तेथले,
कर्णिकार-शिरिं नृत्यकलेने पुष्पमुकुट चढविले !
तरुही फुलले–भिल्लाची मग काय वदावी स्थिति ?
निपचित पडला, घडिभर झाला मृतच आपणाप्रती !
विश्वेश्वरिच्या दिव्य यामिनी-कबरी-भारांतुन
गुलाब गळला तोच जयाला अरुण बोलती जन !
तसाच टाकुन गणदासातें देहभानविरहित
पळतच गेल्या गेहीं सगळ्या त्या हासत–खिदळत !
उघडी डोळे रविकिरणांचे भाले त्या स्पर्शितां,
शुद्धबुद्ध परि हरिली त्याची भारतिने तत्त्वता !

तेंव्हापासुन पिशापरी तो गहन तुडवि निजपदीं
"भारति ! भारति !–"साद तयाची गिरिकुहरें घुमवितो !

  

## भारतीस–

[ जाति–पादाकुलक ]

भिल्लिण कोणी रंभा मानुन
सुखें कंठिलें असतें जीवन–
परि भिल्लातें तूं वंचियलें
–कांचहि फुटली, रत्नहि गेलें !

यदृच्छावशें त्वां भेटावें,
गणदासानें वेडें व्हावें,
–काय असावा विधिघटनेचा
जीवितहेतू हाच तयाचा ?

# परिवर्तन

[ शा० वि०–सुनीत

खेळे मन्मथमंजरी दिनभरीं जी माझिया अंतरीं
–स्वप्नींही कुतुकें निशीं प्रगटुनी लीला मनोज्ञा करी–
तीतें मी वदलों, "सखे! हृदय हें पायीं तुझ्या अर्पिलें!"
"त्याची पायघडी करीन!"–म्हणुनी ती त्यावरी उत्तरे!
–या शब्दें हृदिं शोक तीव्र जडला कैसा निराशाभयें
तूझा त्यामधिं नित्य वास मदना! तूं जाणशी तें स्वयें;
आता तूंच करी 'अशोक' सदयें कैसें तरी त्याजला
–केला जो रतिनें विलाप दहनीं बा! आण त्याची तुला!–

त्यातें दिव्य अशोकवृक्षमयता येणेंपरी लाभतां
होवो स्त्रीपदघात त्यावरि किती झाला जरी तत्त्वता!
तेणें तो बहरेल, तींच विशिखीं गुंफोनि सारीं फुलें
विंधोनी मग कोमला करि तिला संतप्त कामानलें!
आधी मद्हृदयासि जी अवगणी तें तत्पदीं अर्पितां,
आता वाहिल आपुलेंच मज ती पावोनि लोलंगता!

---

# रजनी

—: उत्तर कृष्णपक्षांतील एका रात्रीचें उत्प्रेक्षामय वर्णन :—

[जाति-चंद्रकांत]

हळूहळू ये दिनामागुनी रजनी उदयाला
बघुनी तिजला बहर पातला काव्यकल्पनेला :

रात्र-कोकिळा अवकाशाच्या निज नीडामधला
वसुंधरेचा कोश आगळा ये उबवायाला !
लोह-खंड ही निशा, त्यापरी, दिवस गारगोटी
घर्षण होतां ग्रहगोलांच्या की ठिणग्या पडती !
रात्ररूप या पार्थिवलिंगा पूजितसे कोणी
धवल तारकाक्षता अर्पिल्या की त्यालागोनी !
आकाशाच्या शेतामाजी कणसें मोत्यांचीं
झटुन करितसे वृद्ध विधाता की राखण त्यांची
बागुलबोवा उभारूनिया काळा रजनीचा
गोफणमारा जवें चालवी तुटत्या ताऱ्यांचा !
दिन-गौरांगा जटाजूट हा शोभे रात्रीचा
झुळझुळ वाहे ओघ त्यांतुनी की स्वर्गंगेचा !
भ्रमरीच गमे दुजी शर्वरी ही कभिन्नकाळी
स्वैर बागडे नरनारींच्या की लोचनकमलीं—

त्या कमलींचा मधु जागृतिचा आनंदें सेवी
        निद्रा-जडता-दंश त्या स्थळीं ठेवुनिया जाई !

अज्ञाताच्या बिळांतुनी की ही नागिण आली
        शशि-मणि काढुन शीर्षामधला विचरे मोदभरी !
ज्योत्स्ना-गंगा येइ यामिनी-कालिंदीलागी
        शशांकाचिया गंगोत्रींतुन भेटाया वेगीं !
निशा-गोपिका निघे घेउनी की शशि-कुंभ शिरीं
        कपटी, काळा 'कृष्ण' लपोनी हळुच खडा मारी—
दुग्ध सांडलें, घटालागुनी अंक-छिद्र पडलें
        गौळण भिजुनी चिंब जाहली, अंग उजळ झालें !

शुभमंगल का तुझें व्हायचें वद रजनी ! बाई ?
        किलबिलरूपें उडे 'द्विजां'ची तरिच लगिनघाई !
नाकीं तुझिया दिव्य मोरणी चमके शुक्राची
        हातपावली पदां उषेची आरुण रंगाची !
गगनदेविच्या लागुन कानीं पुसशी का तिजला :
        "कैसा आहे वर्ण ति-क-ड-चा गोरा की काळा ?"
थांब घडिभरी, स्वयें तूंच घे पाहुन डोळ्यांनी
        अरे, पोर ही भिवया उडवित बघ ! गेली उठुनी !

---

# ढगाआडील चांदणी

[ राग-बिहाग ]

हास चांदणी !
का घेशी निज वदनीं पदर ओढुनी ?–ध्रु०

गगनिं तिमिर, भुवनिं तिमिर
विजनिं तिमिर, जनिंहि तिमिर
तिमिर मन्मनीं !
तुजविण ही कोण करी दूर जाचणी ? १

क्षणच तुझा उदय होत
क्षणच तुझी छबि झळकत
परि दुज्या क्षणीं
पदराने वदनातें घेशि झाकुनी ! २

तेज तुझें मम जीवन :
असुन नसे मी त्याविण !
शीण लोचनीं–
येइ गडे नभिं तुजला शोधशोधुनी ! ३

ज्योत्स्नेचा लाभ कुठुन
व्हावा तो मजलागुन ?
तुजशिं वेधुनी
चांदणीच पूर्णशशी मानिली मनीं ! ४

त्या तुझेहि हास्य-किरण
घन तिमिरीं मज मिळति न !
दीर्घ यामिनी
कंठुं काय तुजसाठी झुरत राहुनी ! ५

वाटतसे गगनिं उडुनि
प्यावें तव तेज नयनिं—
पदर सारुनी;
परि टाकी जडतेचा पाश जखडुनी ! ६

---

## वेड ग खपुष्पाचें

[ छंद-उद्धव ]

वेड ग खपुष्पाचें
जडलें हें कोठोनी ?
हासती मजलागी
अवघ्या शेजारिणी ! १

वेड ग खपुष्पाचें
धुंडिलें येथे-तेथे :
लागे ना खपुष्पाचा
कोठेही माग मातें ! २

वेड ग खपुष्पाचें
सुजाण शेजारिणी
कागदी फुलानेही
तयांची हो शिराणी ! ३

वेड ग खपुष्पाचें
खुळीला मला त्यांची
लाभे ही सुजाणता
जन्मांत तरी कैची ! ४

वेड ग खपुष्पाचें  
जीवाने माझ्या बाई !  
एकच खपुष्पाची  
घेतली घोकणी ही ! ५

वेड ग खपुष्पाचें  
अघ्रात त्याचा वास  
नेतसे स्वप्नमयी  
भूमीस मन्मनास ! ६

वेड ग खपुष्पाचें  
धुंडिलें येथे—तेथे  
लागावा खपुष्पाचा  
कोठोनी माग मातें ! ७

---

## गाऊं कसें तरी ?

[ मात्रिक गज्जल ]

वद मायभूमि ! तूंतें गाऊं कसें तरी ?
तुज गीत गावयातें धजते न वैखरी !–ध्रु०

जेणें भरून रत्नें, मोत्येंहि आगळीं
द्याव्यात ओंजळीच्या तुज नित्य ओंजळी–
तो अंबुधीच आता परतंत्रता वरी
पृष्ठीं खुशाल वाही रिपुच्याहि रणतरी ! १

तव कूस धन्य केली किति वीरपुंगवीं–
एकाश्रुही तुझा त्यां रणरंगिं रंगवी !
गत काय पुत्रकांची तव आजला परी ?
–अंगार ठेविताती निज मंदिरावरी ! २

ही सृष्टि सर्व व्हाया बटकी तुझी सदा,
साऱ्या तुझ्या सुतांहीं सेवावया पदा–
आता हवा प्रतापी शाहीर फाकडा
गानीं तुझेच करि जो अवघ्या जडाऽजडा ! ३

एकेक शब्द त्याचा हो वज्र वैरियां
जेते म्हणून नुरती लोकीं पहावया !
दुबळ्या गिरेस माझ्या थोरी न ही परी
–मग मायभूमि ! तूंतें गाऊं कसें तरी ? ४

# कपटवेष

## एक अंकी नाट्यकाव्य

[ छंद–चंद्रकांत ]

### पात्रें

| | |
|---|---|
| गौतमबुद्ध | बौद्धधर्मसंस्थापक. |
| उदयन | वत्सदेशचा राजा. |
| विभावरी | उदयनाची पट्टराणी. |
| उषा, संध्या | विभावरीच्या सख्या. |
| मार | बौद्धवाङ्मयांतील 'सॅटन.' |
| तृष्णा, रति, अरति | माराच्या मुली. |

शिवाय उदयनाच्या इतर सात राण्या.

### अंक पहिला

स्थळः—कोशांबी नगरींतील राजमंदिर.

वेळः—शुक्लाष्टमीची पूर्वरात्र.

(राजमंदिरांतलें शृंगारलेलें पूजागृह. पूजागृहास एकच प्रवेशद्वार आहे. आंत ठिकठिकाणीं रत्नदीप ठेवलेले आहेत. मध्यभागीं सुवर्णासनावर गौतमबुद्ध अधिष्ठित झाला असून त्याच्या दोहों बाजूंनी सुवर्णाच्या दोन समया तेवत आहेत. गौतमाच्या मागल्या बाजूची भिंत जाळीदार आहे, व त्या जाळीशीं कांही आकृति मधूनमधून डोकावतांना दिसतात. गौतमासमोर एक 'रमणी' बसली आहे. रमणी-च्या डाव्या हाताकडे पूजासाहित्य मांडलेलें असून जवळच तिच्या दोन सख्या उभ्या आहेत. रमणीने गौतमाची पूजा नुकतीच आटोपली आहे.)

**रमणी** : उषे, ठेव आवरून पूजासाहित्य;
–झाली बाई ! यथासांग पूजा अवघी !
संध्ये, सार वाती जरा समईंतल्या–

**संध्या** : निकें, महाराज–

**रमणी** : वेडे, वोसणिशी का ?
महाराज गे मी आहें की महादेवी ?

**संध्या** : महादेवीचि आपण; बरळलें मी !

(उषा व संध्या सांगितल्याप्रमाणें करतात.)

**रमणी** : बुद्धदेवा ! आज किती हर्ष मन्मनीं !
आपण येऊन येथे घेतली पूजा !
राजमंदिरा आपुलें चित्त विटलें,
–द्विवचनातें उबगे जैसें प्राकृत !
प्रिय आपणा निवास रानीं-स्मशानीं,
पर्णकुटिकाच वाटे इंद्रभवन !
कौशांबींत आगमन होतांच काल
घोषितारामीं आपुला होई मुक्काम.
कालिंदीतटाकींचें तें स्थान निर्जन
मनोज्ञच आपणातें नंदनाहून !
परी आज उपोसथ-दिन पवित्र,
करावा वाटला रात्रीं धर्मजागर–
म्हणूनच येवोनिया पुण्यदर्शना
"निशीं भूपभवनीं या घ्यावया सेवा !"

—ऐशी प्रार्थना मी केली आपुल्या पदीं,
आणि, आपणाही हो ती विनती मान्य.
धन्य दिवस ! धन्य, धन्य मीही !
बुद्धपादसेवा आज मज घडली !

**गौतम** (हसून) : विभावरी, यज्ञकुंडीं जैसे वैदिक
निर्दयपणें आहुती देती मेषाची,
तैसा तुवां अदयत्वें निज आग्रहें
माझ्या निश्चयाचा आज घेतला बळी !
आम्ही मुंडक—आम्हाला राजगृहाचा
नसता संपर्क आता हवा कासया ?
कपिलवस्तू सोडिलें तेव्हापासून
राजवाड्याची मी नेघें कधी साउली.
विषय तो मूर्त; करी पुण्याचा क्षय,
—हेमंत घटवी जैसें दिनमानातें !
तशांतच उदयन—येथला स्वामी—
माझ्या आगमनाआधी जाई मृगये ;
निर्गमन होतां क्षणीं सिद्धियोगाचें
व्यतिपाताने लगेच व्हावें प्रगट,
— काय तैसा वागूं मीही ?—

**रमणी** : तिथीने स्वयं
व्यतिपाताशींच जरी निमंत्रियलें,
तरी कां न प्रगटावें, वदा, तयाने ?

आणि, काय नव्हेच मी येथली कुणी ?
आर्यपुत्राभावीं त्याच्या पट्टराणीची
राजगृहीं चालायची न काय सत्ता ?
मी तयाच्या अपरोक्ष आपणालागीं
सहेतुक पाचारिलें—

(हें ऐकल्यावर उषा व संध्या यांना हसें न आवरून त्या खुदकन् हसतात ! )

**गौतम** : कां या हासती ?—
केव्हाचा मी बघतसें या बाला दोन्ही
एकमेकां खुणाविती !

**रमणी** : छे, तें उगीच !
काय झालें गे सारखें तुम्हां हासाया ?
जा, जा, आणि दाराचिया दोन्ही पापण्या
मिटवा हळूच—

(उषा व संध्या जाऊं लागतात.)

अगे, थांबा क्षणैक !

( असें म्हणून ती रमणी स्वतः उठून दाराकडे जाते, व त्या दोघींच्या कानाशीं कुजबुजते. )

उषे, संध्ये, येणेंपरी वर्तुन तुम्हां
काय होता करायचा गोपनस्फोट ?
तुम्ही जा, हें उपस्थान तुमचें येथ
अडगळीसारखेंच होई मजशीं !
महादेवीसांगातीं त्या जाळीच्या आड
बघा अवघ्या महिषी आल्या न आल्या.

सांगा अवलंबावया स्तब्धता तयां,
आणि, यज्ञशाळेंतही जा डोकावून.

( उषा व संध्या प्रणाम करून जातात, आणि जातांना प्रवेशद्वार बाहेरून लोटून घेतात. )

(स्वगत) कैसें साधे सोंग हें ?—ये मजही हसूं
कळीच्या पाकळ्या बळें सारून दूर
गंध प्रकटे बाहेर तदंतरींचा,
—तैसे सुटून माझिया ओष्ठांमधून
प्रस्फुट ही व्हाया पाहे हास्यलहरी !

गौतम : विभावरी ! 'सहेतुक पाचारिलें' तूं
उद्गारून एकाएकीं कां थांबलीस ?
कैचा हेत तो ?—काय हें गौडबगाल ?
सांग सारें !

रमणी : अहो, वेड कां पांघरितां ?
काय चतुरा ! आपणा नुमगे हेंही ?
कां अवघें वदवितां माझ्याच मुखें ?
काय कपिलवस्तूंत अंगनेसंगें
शृंगाररसतरंगीं नच रंगलां ?
काय तिने न दाविले आपुले भाव ?
—काय आपणां कधीही कळ्ले न ते ?
काय माझी या वेळची ही वेषभूषा
कांहीही आपणालागीं नच सुचवी ?

काय रत्नभूषणांची वाण पडली—
म्हणून हे मृणालांचे ललाम ल्यालें ?
चोरीला ताटंकें गेलीं माझीं, म्हणून—
श्रवणीं केतकीपत्रें मी कां ठेविलीं
काय काश्मीरांत आता न हो केशर ?—
कस्तूरीमृग निमाले कां भूवरीचे ?—
म्हणून काय मी निज देहीं चर्चिली
ही कर्पूर चंदनाची नुसती उटी ?
अजूनही हे चुगल शीतोपचार
रहस्य न कथिती कां आपणां माझें ?

**गौतम** : शिव, शिव ! ऐकिलें हें काय भलतें !
वंचित नाहीत न हे मत्कर्ण मज ?
मंगल जागर काय हाच गे तुझा ?
धर्मजिज्ञासा हीच कां म्हणावी ?
तुजपाशीं ठेव तव पातिव्रत्याची
निश्चिन्त मनें ठेवून जाई नृवर;
निज मोलागळी ठेव न निक्षेपिशी,
'न्या हो ही !'—उलट ऐसें अन्यां म्हणशी !
काय म्हणावें यातें ?——

**रमणी** : —हें प्रेमनैराश्य !——
याहून त्या कटुतर न लावा शब्द !
कसलें तें प्रातिव्रत्य ?—कसला ठेवा ?
—मनाचीच खरोखर ही सारी माया !

बुद्धदेवा ! स्मरतो कां, वदा, आपणां
मागन्दिय ब्राह्मण तो कुरुदेशींचा ?
हेमवर्णा तत्सुतेच्या तनु-चषकीं
फेसाळ यौवन-मद्य निसर्ग ओती !
रम्य दर्शनीं आपुल्या लागे बोलाया
तियेचा हृदय-क्रौंच प्रेम-मध्यम !
तीतें वराया आपणां तत्पिता याची,
ते वेळीं आपण होतां जाहलां 'बुद्ध' !!
त्यायोगें तें जुळलें न;—नाठवे काय ?

**गौतम** : हो—हो. स्मरे आता.

**रमणी** : मीच ती मागन्दिया !

**गौतम** : तीच तूं ?—

**रमणी** : अजून न कां पटे ओळख ?
कां हो बघतां मजशीं ऐसें रोखून ?
चकित-थकित होतां कां हो यापरी ?
काय वाटे स्वप्नच हें जागपणींचें !

**गौतम** : नवलच जरी तीच तू द्विजसुता !
सान इवली ती, थोर तिजहून तूं—
स्वातीएवढें जाहलें आर्द्रा नक्षत्र !
कोमल ती किती, राठ तूं अळुमाळ,
की चिनारपर्ण झालें आम्रपर्णच !
म्हणूं कैशी तीच तूं ?—

**रमणी** : —हें फोल तर्कट !—

तरुणी दिसावी कैशी बालिकेवाणी ?
गरगरीत, तेजाळ पूर्णशशीतें–
बीजेच्या तो कोरीपरी न दिसतसे
म्हणून का कधी कुणी हिणवितात ?
–परिणति ही म्हणावी किंवा विकृती ?

( इतक्यांत जाळीदार भिंतीकडून अस्फुट हास्यध्वनि ऐकूं येतो.)

**गौतम** : हास्य-मौक्तिक-चूण हें उधळी कोण ?
–हास्यरसातें जो तो कां चढवी गोडी ?
सख्या मघांशीं हासल्या, हें हासे कोणी,
–काय या राजभवना हो हर्षवायू ?

**रमणी** : असतील कुणी तरी दासी-बटकी
थट्टा-विनोद करीत होतां उसंत;
मनश्चंदनाची, सांगा आधी, आपुल्या
संशय भुजंगमाची मिठी सुटे की ?
आपणां भुलली मीच ना ती कन्यका ?

**गौतम** : आणि, कशी राज्ञी होशी ?

**रमणी** : –मौजच तीही !–
म्हणती : पुरुषभाग्य अगम्य सुरां;
–स्त्रीभाग्यही काय तैसें नाही म्हणावें ?
द्विजस्त्री होऊन जिने द्विजासहित
अग्निहोत्र पाळायचें, तीच सनृप–
करी अश्वमेध अंतीं दिग्विजयाच्या !
–भाग्यगुणच हा माझा न म्हणूं काय ?

विरक्त होऊन तात हो वनवासी,
पितृव्य दे मजलागीं उदयनातें.
दरिद्रसुता तरी मी लावण्यलक्ष्मी,
सहजच वत्सराज मज स्वीकरी.
काम साथी माझा–तोच मज कारणें
घालीतसे वीरासन मम हृदयीं :
तेथून मन्नयनांच्या गवाक्षांतून
उदयनावरतीं तो शर मोकली !
–भूप मज पट्टराणी करी तात्काळ :
लौकिकांत तरी झालें यापरी त्याची !
दिलें पत्नीत्व त्या !–द्यावी प्रीतीही कैशी ?
तेजापरी ऊबही का दे हिरकणी ?
प्रभो ! माझ्या हृन्मंदिरीं रायाऐवजी
आपुलीच होऊं लागे मानसपूजा !
प्रेमपुष्प आपुलिया मूर्तीतें लाधे :
निर्माल्यही उदयना न मिळे त्याचें !!
अन्य रीतीने घडाया आपुलें ध्यान
नृपें वरजलें तरी मी झालें बौद्ध !
मोक्ष-गुरु म्हणून न, परी आपुली—
प्रियकर म्हणूनच मूर्ती ये मनीं !
एकावरी मन वोळे, दुज्याची तनू,
केवी ध्वजा मिरवावी पातिव्रत्याची ?
आपणावरीचें माझें तेव्हापासून

पूर्वींचें तें शुद्ध प्रेम जाहलें दग्ध !
हृदयाच्या ओसाडींत वसे संप्रती
करपल्या त्या प्रीतीचें पिशाच्च मात्र !
कां न मग वासना ही व्हावी मजशीं
एकांतांत भेटायची आपणालागीं ?
'बुद्ध नगरीं आले'—हें निवेदावया
यौगंधरायणें दूत वनीं धाडिला.
उषःकालीं उदयन उद्या येईल :
—चला, घेऊं पुरवून त्या आधी हौस !
न यावा तो आला योग हा अवचित,
किती पाहतां सखया ! अंत दासीचा ?

(पुन्हा त्या जाळीदार भिंतीकडून दाबून टाकण्याचा प्रयत्न केलेला हास्य-ध्वनि होतो ! पण गौतमाचें तिकडे लक्ष्य नसतें.)

**गौतम** (स्वगत) : अहा ! काय संकट हें ओढवें तरी !
कोणत्या उपायीं त्याची फेडावी गोवी ?
शंकाही या अरिष्टाची येती मजला,
तरी मी या पापपंकीं येतों कासया ?
हिजसाठी मी लंघिला निज निश्चय,
आणि, हीच लोटूं पाहे मज रौरवीं !

(तो ध्यानस्थ बसतो. त्याने डोळे मिटलेले पाहून ती रमणी त्या जाळीदार भिंतीकडे पाहत हाताने स्तब्ध राहण्याची खूण करिते. तोंच मार हा तृष्णा, रति व अरति यांच्यासह लगबगीने प्रवेश करून गौतमाला घेरतो. माराच्या हातांत धनुष्य व पाठीशीं बाणांचा भाता आहे. हीं चौघेंही त्या रमणीला अदृश्य आहेत.)

**मार :**

[राग-भूप]

वाजवा दुंदुभी ! पुष्पवृष्टी करा !
बुद्ध अपुल्या करीं आज आला पुरा ! –ध्रु०
माझिया तूणिरीं कामिनी-नयन-शर
माखिलें त्यांप्रती घोर हालाहल !
कन्यकांनो ! तुम्हां त्याच शरिं योजुनी
विंधिताहें तयीं गौतमालागुनी !
हृदयिं विशिखांसवें खोल रुतुनी बसा :
–घ्या क्षणीं मोहुनी त्याचिया मानसा !
पुण्य त्याचें हरुन बुद्धपण लोपवा,
देवशत्रूंमधे मेळवा वाहवा !
नरकपुररक्षका ! द्वार दे उघडुनी,
–येत गौतम तुझ्या नरकपुरि लागुनी !

**तृष्णा, रति व अरति सर्व मिळून :**

[ छंद–पादाकुलक, अंत्य चरण वगळून. ]

गौतमाच्या मन:कोषीं
शरें शिरूं या निमिषीं
हरूं त्याच्या बुद्धत्वाला,
चला ग चला !

**तृष्णा :**

भोग-मृगजळामागें
पळवीन अनुरागें

त्याच्या चित्तकुरंगाला,
चला ग चला !

रति :

विषयाचें मधुपान
निशिदिन घडवीन
त्याच्या मनोभ्रमराला,
चला ग चला !

अरति :

हरीन मी त्याची शांती
बुद्धत्वेंच जिची प्राप्तीः
मुकेल तो बुद्धत्वाला,
चला ग चला !

( नंतर मार स्पर्शमात्रेंकरून तिघींची बाणांवर योजना करतो व ते गौतमावर सोडतो; पण सर्व बाण निष्फळ ठरतात ! )

मार :

[ राग–कालंगडा ]

सहवे न पराभव हा मजला ! – ध्रु०
नवलच मजवर–मात करी नर
शलभ जिंकितो गरुडाला !
दुस्सह शर मम–ठरले सुमसम
अग्निकणच हिमकण झाला !
त्यजी न गौतम–लवही शमदम
कोण भुवनिं चळविल त्याला ?

तरुणांनी–फडफड करुनी
अचल कधी का डळमळला ?
पळा पळा तरि–इथुनी सत्वरि
नातरि हा शापिल सकलां !

( तीं सर्व घाईघाईने तेथून निघून जातात. )

**रमणी** : काय प्रिया ! एकाग्रता ऐशी साधून
कामसूत्रें आठवितां पूर्वी घोकलीं ?
भुललां कां रतिविद्या ?

**गौतम** : –देवी ! काय हें ?–
स्त्रीसहज लज्जा, काय, त्यजिशी सारी ?
गंगेने टाकाव्या चुळा जैशा मद्याच्या,
तैसें स्त्रीने उच्चारणें वाणी अभद्र !
स्त्रीशीं अनुचित ऐसे ऐकून बोल
गमे बोले पुरुषच स्त्रीवेषधारी !
स्त्री वदेल ऐसें कशी ?

( हें ऐकून आता स्वतः त्या रमणीलाहि अनावर हसूं लोटतें ! )

काय, महिषी !
फवारे उडवितेस तूंही हास्याचे ?
काय मज वेडा-पिसा गणितां तुम्ही ?
–विदूषक स्वपतीचा मानिशी मातें ?

**रमणी** : आपणच बोलायचें कांहीच्या बाही,
आणि, देतां दूषणही हासतां कुणी !

प्रेमनारायणा ! जैशी मी हासें–खेळें,
साहीं तैशीच आहळी विरहाचीही !
राजगृहपुरी न कां एकाच वेळीं
न्हाते सरस्वतीपरी तपोदेंतही ?
परोपरीचे मी करीं शीतोपचार,
तरीही न व्यथा माझी लव हो कमी !
आपण व्हा धन्वंतरी–आपल्याविना
कोण ही आग शमवी अधररसीं ?

**गौतम** : विभावरी ! कां धरिशी ही कुवासना
उदयनाऐसा पति लाभून तुज ?
कीर्त ऐकिली तयाच्या रूपच्छवीची :
–अभिजित् ताराही वाटे तुच्छ त्यापुढे !
आणि, वीरही तो गाढा–चतुराग्रणी–
शृंगार शृंगाराचा–कलानिधीही–
कृष्णच त्या मानितातीं; कृष्णापरिस–
अष्टनायिकाहि त्या.–तूं त्यांत रुक्मिणी !–
कां तूं सोडून वाळयातें त्या सुवासिक
आदरूं पहाशी तृण गंधविहीन ?
पहा, जरा निरखून पहा मजला–
रूपलावण्याचा कुठे लागे कां ठाव ?
विशोभित मोर जैसा पिसाऱ्यावीण,
दिसे त्यापरी हें माझें मुंडित शीर्ष !
ऊन-पावसांत तप मीं आचरिलें

तेणें अंगकांती गेली झाकळूनिया !
तीव्र तपोवेशाखांत मदंतरींचा
अष्ट-रस-प्रवाहांचा खळखळाट—
मुक्तांच प्रवाह, हो शांत सदाचा
आणि, शांतता केवळ ऱ्हदीं उरली !
येथून साहित्यवेत्ते गणोत पुढे
'शांत' नामक नव वा नववा रस !
एकल्या त्या शृंगाराची कथा ती काय,
रस आठही आळले जेथ यापरी ?
रमणी : प्रेम असे आंधळें—हें त्रिलोकीं ख्यात,
कशाला मग हा गडे वृथा वादंग ?
कुरूप वा रूपवंत—रंक वा राव—
प्रीतीच्या राज्यांत सारे समसमान !
कुतनू कुबेरा वश अप्सरागण,
भणंग शिवातें वरी हिमनगजा !
आणि, खरेंच कथूं का जिवींचें गुज ?
-मत्प्रेम मजवरीच आपणाहून !
मत्सौंदर्यकला व्हावी विश्वमोहन,
हीच कांक्षा मन्मनांत ममत्वमूल !
—भुरभुरवून माझे नील कुंतल
दर्शवी मारुत प्रेम मजवरीचें !
सूर्य-चंद्र हेही होती मोहसंमूढ :
मज कोमाळिती निज किरण-करीं !

जलसंचयीं मी जरा डोकावतांच,
ऱ्हदीं साठवी मद्रूप तो बिंबरूपें !
—अचेतनही जियेतें यापरी भुले,
अचेतनांचें कैवल्य केवी हो न ती ?
माझिया लावण्यजालीं नातुडलेले
धरातलीं आपणच आता एकले !
कैसें मजला सौंदर्य-सम्राज्ञीपद—
लाभावें, मीं आपणातें जिंकल्याविना !
चला रतिमंदिरांत—

**गौतम** : कां बधिरातें
वृथा गाऊन दाविशी रागरागिण्या ?
जैसा वाट चुकूनिया कुणी पथिक
घोर काननीं रहावा भ्रमत निशीं,
आणि, तोंच अवचित तेजाचा झोत
दुरून तयाच्या यावा दृष्टिपथांत,
वाटावें निकटवर्ती खेडयांतील तें
दीपकाचें तेज तया; आणि, हरिखें—
जावा तो त्या अनुरोधें त्या दिशेकडे
परी जातां दीप्तीपाशीं तया दिसावा
तेजःपुंज रत्नमणी दीपाऐवजी !—
—कोण व्हावा त्या विस्मय आणि भयही !—
इतुक्यांत त्या रत्नाच्या दिव्य प्रकाशीं
आढळांत यावी त्याच्या कांहीशी दूर

सरसरती लाटच कृष्णसर्पाची !–
–त्याच क्षणीं तो पळावा जीव घेऊन,
लवही न मोह होतां सर्पमण्याचा !–
–तैसाच मी होणार न तुजशीं लुब्ध !
जाऊं दे मजशीं–

**रमणी** (अडवून) : थांब, कुठे रे जाशी ?
मज दुखवून कैसा सुटशी जिता ?
खेळच मांडिला तुवां अग्निज्वालेशीं !
माझिया सौंदर्यश्रीची तुवां उद्धतें
अवगणना पुनश्च ही केली आहे !
शुकच तूं होशी; परी मज शुकाचें–
शुककाकाहून काय मोल अधिक ?
अवमानितां राज्ञीतें काय घडतें,
–तूंही राजकुमार !–हें तूंतें ठाऊक !

( नंतर ती रमणी तीनदा टाळी वाजविते, त्याबरोबर त्या जाळीदार भिंतीचा चोर-दरवाजा धाडकन् उघडला जातो, आणि त्या दरवाजांतून सर्वांग काळ्या वस्त्राने झांकलें आहे, व हातांत नग्न तरवारी आहेत अशा आठ व्यक्ति भराभर बाहेर पडतात. )

चला, वेढा या मुंडका

(त्या व्यक्ति गौतमाला घेरतात.)

ऐक रे ऐक !
आता तरी मजलागी होई तू वश–
ना तरी ये मृत्यूचीच तुजला हाक !

तुझ्या मुखामधून ये जरी नकार,
तरी तीच तुझी तुज जाण वधाज्ञा !
पडतील तुजवरी खड्‌ग सर्वांचे,
उष्ण रक्ताचे फवारे उफाळतील !
आणि, "बुद्धाची हरली शुद्धबुद्धच–
जेधवा त्या पूजेस्तव मीं निमंत्रिलें :
मज धरी भ्रष्टायची तो नीच मती !"
–येणेंपरी मी लटकें कथीन भूपा !

**गौतम** : काय गे मुळी न तुज लज्जा-संकोच
अभित या अवध्याच्या ऐसें वदाया ?
आळ कसलाही सुखें घे मजवरी :
क्षिति त्याची नाही–आहें जोंवरी पूत !
विवाहापरी मंगल मज निधन :
भीति मग मरणाची काय दाविशी ?
कां मी मानूं खेद तव तीव्र शब्दांचा ?
–उल्केंतून अशनीच वर्षावयाचे !

**रमणी** : अभागीच श्रमणा ! तूं दिसशी पुरा :
भर तीन्ही सांजा येतां स्वगृहीं लक्ष्मी,
दीप तेवता दादून तूं मालवून–
कां जाया लावशी तीतें मागल्या पदीं ?
झालें असतें शेजेची मी सांगातिण,
लुटला असता रस उभयतांही !
लपवूं आता कासया ?–तुझ्याच साठी

उदयना 'निर्वाण' मीं असतें दिलें !
वत्सदेशची राज्यश्री हीच सवत
येती मज !–

**गौतम :** –विभावरी ! सार्थ त्वन्नाम !–
प्रत्यहीं घडती घोर निशीथकाळीं
व्यभिचार, तस्करत्व, नृशंस वध !
सामावले तव ठायीं हे सर्व दोष :
–खरीच तूं 'विभावरी' मज दिसशी !

**रमणी :** पुरे, पुरे, जल्प किती मूढा ! करिशी ?
–मौज पहा ही उघडे ठेवून डोळे !
चल, माझ्या अष्टका ! तूं आता हो सिद्ध–
वातावरणीं क्षणैक नाचवी शस्त्रें :
खड्गकोशाच बनवी बुद्ध-तनूचा,
–त्यांत निज असिलता विश्रमूं देई !

( त्या अवगुंठित आठ व्यक्ति आपपल्या तरवारी हवेंत उंच नाचवूं लागतात. गौतम वक्षःस्थळावर हाताचें स्वस्तिक करून व मस्तक खाली लववून मरणास शांतपणें सिद्ध होतो ! त्या क्षणीं ती 'रमणी' त्याचे पाय धरिते ! )

काय म्हणूं ?–किती वानूं ?–न पुरे वाणी !
अनंत जाहलें सान्त आपुल्या रूपें !
कटु वचनांची माझ्या करावी क्षमा;
आणि, आपणातें धृष्टें मीं वंचिलेंही !
मी न विभावरी; परी वेषांतरित
उदयनच मी !–

**गौतम :** काय हा चमत्कार !–

तूंच काय उदयन कौशांबीपति ?
ऊठ, रे ऊठ !–

**उदयन :** आधी द्या मज अभय !

**गौतम :** तुज सदाच अभय !

**उदयन :** आता ये धीर !

**गौतम :** विभावरी कोठे असे ?

( त्या अवगुंठित व्यक्तींपैकी एक व्यक्ति लगेच अवगुंठन झुगारून देऊन गौतमास प्रणाम करिते. )

**विभावरी :** –ही मी वंदितें !

**गौतम :** भद्रे ! असो शुभ तव सदासर्वदा !
आणि, कोण हो हीं पात्रें अवगुंठित
कपटनाटकांतील तुम्हा दोघांच्या ?

**उदयन :** संसृति-वेणूचीं माझ्या बुद्धदेवा ! हीं
सप्त-सुर-स्थानें !

**विभावरी :** मी न कां त्यांत कुणी ?

**उदयन :** तूं न कशी कुणी ?–तूं गे वेणुमुखच !

( सर्व हसतात. मग त्या राण्या भराभर अवगुंठन टाकून प्रगट होतात, व एकामागून एक गौतमास नमस्कार करितात. )

**गौतम :** प्रतिबिंबेंच या सर्व विभावरीचीं !
श्रुत होते राया ! तव गुण अनंत,
नटही तूं असशी–हें आज कळों ये !
भिन्नभिन्न गुणांचें तूं भांडार मूर्त !

—स्त्री-वेषींही शोभशी !—

**उदयन** : —छे, मी उंच, राठ !—

( सर्व हसतात; गौतमही हसतो. )

**गौतम** : आणि, कैतवकोविदा ! कासया केलें
भरतमुनी हो थक्क ऐसें हें नाटय ?

**उदयन** : आपण जाळून काम तपोहुताशीं
दुजा शिवावतारच झालां कलींत,
—याची बघायची होती मज सत्यता,
म्हणूनच आचरिलें आम्हीं हें छद्म !
ठावें आपणा : एकांतीं नव दंपती
पुसती—सांगती गुह्य परस्परांचें—
त्या परी मीं गुजगोष्ट विभावरीतें
पुसतांच, ती निवेदी आपुलें वृत्त !
विभावरी ऐशी दिव्य शृंगारखनी
अव्हेरीली आपण—हें अद्भुत अती !
परी त्यांत एक मज भासे वैगुण्य :
याची तत्पिता आपणां; न स्वयं बाला !
लावण्यमंजरी स्वयें दावी हृद्गत,
तरी कोण नर तीतें न होई वश ?
मेनकेतें न प्रेषितां, स्वयं आपण
असतें याचिलें इंद्रें विश्वामित्रातें :
"ऋषे ! मेनकेतें तुवां अंगिकारावें—
'निकें' म्हणतांच तूं मी धाडीन तीतें !"

—तरी काय लोलंगता तदंतर्यामीं
उपजून तो ढळता तपापासून ?
म्हणून मी महिषीतें म्हणें विनोदें :
"देवी ! स्वयें तूं एकदा विनवी बुद्धा :
तरीच ये कस्तूरिका आणि मृत्तिका
निवडितां आपणातें !"—

**गौतम :** —ती काय वदे ?

**उदयन :** निज तें न मानवलें; नीतें आपल्या—
मनोनिग्रहाची पुरी होती कल्पना !
आणि, ती हो मनोमय शिष्या आपुली,
थट्टा जरी बहुसाल तिची मीं केली !
जैशी देवयानी कचा मोहून आधी
शेखीं पतिव्रता राणी हो ययातीची ?
—तैशी विभावरी जरी भुले आपणां,
तरी अंतीं माझीच ती हो अंतर्बाह्य !
तिज कैसें रुचावें तें ?—ठाकलों मीच
पसराया मोहजाल कपटवेषें !
तिची सर न ये, तरी आपणच ना—
दिलें माझ्या या वेषाला प्रशस्तिपत्र ?

**गौतम :** आणि, खरेंच सकाळीं घोषितारामीं
स्त्रीवेषें येउन केलें तूं पाचारण,
तेव्हाही ओळखूं न ये तव कैतव !

अजूनही दिसशी तू स्त्रीच लोचनां !

**उदयन :** यापरी योजिलें आम्हीं आपुल्या चित्तीं,
अकस्मात योग आज आला जुळून.
आगमनाची आपुल्या वार्ता मजला
षष्ठीलाच जाणविली चारगणांहीं.
एकाएकी पट्टणीं मी उठवीं हूल :
"भूप मृगयेशीं गेला एकाकी रानीं !"
राजवाडयावीण कुणा सत्य न ठावें,
—यौगंधरायणही तो भ्रमींच राही !
तेणेंच तो दूत धाडी विपिनीं मातें—
आपण आल्याची वार्ता कळवावया !!

(सर्व हसतात.)

**गौतम :** उषा-संध्या कां हासत होत्या मघाशीं,
'महाराज' ऐसें बाही संध्या कां तूंतें,
आणि, जाळीआड कोण होतें हासत,
—मज आता आकळलें हें—

**विभावरी :** आर्यपुत्रा !
तुमच्या स्त्रीवेषें मातें पडलें कोडें :
नायक की नायिका या नाटयांत तुम्ही ?

(सर्व हसतात.)

**उदयन :** सवतीमत्सर काय, देवी, वाटतो

माझ्याच स्त्रीवेषांतील वेषांतराचा ?

( पुनः सर्व हसतात. )

**विभावरी** : आणि, माझ्या अटी दोन्ही ?

**गौतम** : —त्तसे ! कोणत्या ?

**उदयन** : बुद्धदेवा ! आपण या येतां कसाला
सपत्नीक मीं बनावें बुद्धानुयायी,
आणि, घडवावी बुद्ध-मूर्ती चंदनी,
—ऐसा संकेत ठरला तदा आमुचा !
—देवी ! वंशसंभव मी युधिष्ठिराचा !—

**विभावरी** : अहा ! नवस पुरले आज सकल !
बुद्ध आमुचा, आम्हीही झालों बुद्धाचे !
क्षमायाचना, भगवान् , करितसे मी :
—कष्टविलें आपणांनें आम्ही मूढांहीं !
गायत्री-छंद हो सर्व छंदां तारक,
—तैसेंच आपण आम्हां बालकां व्हावें !

**गौतम** : धन्य उदयन ! धन्य विभावरीही !
विभावरीपरी नृपा ! बुद्धही तुवां—
केला आपुलासा; जैसें एकाच वेळीं—
बुध-रोहिणीचें करी विधु पिधान !
विभावरी ! मजही तूं क्षमाच करी :
कटु नेणून बोललों मी तुजविशीं !

कृष्णपक्षांतील न तं घन शर्वरी,
परी तारा-किरीटिनी राकाच साच !

**विभावरी** : प्रभो ! काय आशीर्वाद आम्हां आपुला ?

**गौतम** : विश्वप्रेम हृत्कमलीं तुमच्या वसो :
पावो तेणें प्राणिजात सौख्य उदंड !

**सर्वजण** : तथास्तु ! !

**उदयन** : जा सभागृहीं तुम्ही अवघीं,
धारण करून येतों मी मन्नृवेष !
पहा ! मध्यरात्रीचा हा झडतो डंका,
–बघो प्रभात आपणां बौद्ध झालेले !

( डंका झडूं लागतो; जातात. )

---

# चिव चिव

[ राग—कालंगडा ]

भुलशी कां आपुल्या लेकराला ?
चिव चिव नये का ऐकूं तुला ?—ध्रु०

“दाखवितें—” वदशी—“जग तूंतें
विसरलाशी अंतरीं घरट्यातें !”
—चंचूने तूं बाहेरी काढियेलें
शाखेवरी मजला ठेवियेलें !
आणि, जाशी सवेचि उडून तूं
काय तुझा असावा यांत हेतू ?
ठावे तूंतें : नसती पंख मला
केवि राहूं या स्थळीं मी एकला ?
बघ ! वाहे तुफानी कैसा वात
गदगदा तरूतें डोलवीत !
डळमळे बैसलों ती डहाळी
तोल माझा जाताहे वेळोवेळीं !
धुंद झाल्या धुळीने दिशा दाही
दिसशी न कोठेही लोचनांही !

जाऊं कैसा कोटरीं पंखांवीण ?
    शाखेवरी रहाया धीरही न !
तातडीने आई गे ! येई येथ
    ने, ने मज सत्वरीं घरट्यांत !

उबगशी काय तूं लेकराला ?
    चिवचिव नये का ऐकूं तुला ?

## माझिया जिवा !

[राग–सारंग]

भंगलेल्या कैचा कुंभांत
जीवनाचा लेश उरावा ?
फेक कुंभ सोडुनी खंत
माझिया जिवा ! १

टाका क्षीण धाग्यादोऱ्याचा
जीर्ण पटीं केवि टिकावा ?
तोड बंध तोड हा त्याचा
माझिया जिवा ! २

आसवांहीं मलूल फुला
कोठला तो तजेला यावा ?
सुकूं देई सुखें रे त्याला
माझिया जिवा ! ३

नव कुंभीं नव जीवन
नव पटीं तंतु रे नवा
नव पुष्पीं गंध नवीन
माझिया जिवा ! ४

# आवाहन

[ राग-पहाडी मांड ]

—१—

मंदिर-देवते !
ये, ये मंदिरातें !

किती तुज बाहूं ?
किती वाट पाहूं ?
तुजकडे डोळे
सारखे लागले !

मंदिरीं पाऊल
वाजूं दे कोमल :
आतुर मी मनीं
ऐकाया तो ध्वनी !

—२—

मंदिर-देवते !
ये, ये मंदिरातें !

काटयांत एकलें
फूल फुललेलें

आणिलें तोडून
शिणून–दमून :

परी कधी येशी ?
–फूल माझें घेशी ?
सुवासमिषें तें
निःश्वास सोडितें !

—३—

मंदिर-देवते !
ये, ये मंदिरातें !

वीणा लावियेली,
करांत घेतली,
–कैशी ती वाजवूं ?–
–कैसे भाव दावूं ?–

गत ऐकावया,
भाव जाणावया,
नसशी तूं गडे
वीणा खाली पडे !

—४—

मंदिर-देवते !
ये, ये मंदिरातें !

प्राणांच्या या ज्योती
धगधगताती :
तुज ओवाळीन,
आरती करीन !

नको लावूं वेळ,
ना तरी सकल
व्यर्थ जळतील,
व्यर्थ विझतील !

---

# अंगाई

[ छंद-उद्धव ]

कासया घोंघावून
स्फुंदशी रे पवना !
चहाळ लागतांच
दचके माझा तान्हा ! १

बाई गे बरसाती !
रडूनी धाई धाई
बाळाची माझ्या झोप
करिशी कडू काई ? २

जो जो रे लडिवाळा !
झोपेंत सुखें हास
माणिकमोतियांची
झडूं दे घरीं रास ! ३

नशिबीं थोरपणीं
अश्रूंचा पावसाळा,
बाल्यींच विलसूं दे
हास्याची चंद्रकला ! ४

हसशी जागेपणीं
तैसेंच झोपेंतही
हसवो रे तुजला
जिवती-माऊली ही ! ५

न रडे बरसाती !
स्फुंदी न रे पवना !
चहाळ लागतांच
दचके माझा तान्हा ! ६

---

# पूजिका

[ राग-काफी ]

—१—

पूजापात्र हातीं घेवोनिया घाईघाई
देवमंदिराशीं आलें निशीथसमयीं.
दिगंतीं भरली होती काल-दीपांतली
दिवस-ज्योतीची तिमिराची ही काजळी !
नव्हता एकही दिवा नगरीं तेवत,
कोणाचीही पथीं मज नव्हती सोबत !
भयाण या वेळीं एकलीच मी निघालें,
मंदिरातें बाई ! देवदर्शना पातलें !

—२—

कशाचा मंदिरीं माजला हा कोलाहल ?
एकाएकी काय येई घडून नवल ?
अवेळींच कां ही वाजे घंटा घणघण
कां धावती लोक इकडून—तिकडून ?
चुडे पेटवून शोधिती ते कवणातें ?
"शोधा, मूर्ती शोधा !—" आरोळी कां ऐशी उठे ?
पूजारी कां दुःखें ऊर घेती बडवून ?
मंदिरावरी ये काय संकट दारुण ?

—३—

आजला देवाचा होता उत्सव मंदिरीं,
मूर्तीलागी साज चढविला परोपरी.
हिऱ्यामाणकांचा शोभे देवातें किरीट :
वाटे भूवरी ये नभ तारकाखचित !
यात्रा उत्सवाची भरे मंदिरापुढती—
एकच उसळे तदा यात्रिकांची दाटी !
त्यांतलेच कोणी आभूषणा विलोभती :
मध्यरात्रीं घाला मंदिरा घालती !
अजून देवाची शेज नव्हती रचिली,
साज तो तसाच होता सारा मूर्तीवरी !
दरवडेखोर आले सशस्त्र चालून—
पूजारी बापुडे भयें बैसले दडून !
काढून घ्यावया सावकाश अलंकार
मूर्तीच घेऊन झाले लुटारू पसार !!
मुगुट तो गेला, देवमूर्ती तीही गेली !
—त्याचाच उडाला हाहाःकार हा मंदिरीं !

—४—

नगरीं या देवा ! आलें यात्रेला दुरून,
नाही दिनभरी तुझें घडलें दर्शन !
यात्रिकांची कोण खेचाखेच मंदिरांत !
दुबळी मी, कैशी करूं प्रवेश दाटींत ?

गीतांनी तुजला    पूजायाचा होता हेत,
—गलबल्यांमध    परी कैसें गावें गीत ?
होऊन निराश    परतलें नगरांत,
कंठिला दिवस    नगरच पाहण्यांत !
पातलें भेटीची    आस आता मी धरून
मध्य-निशा-काल    शांत-निवांत बघून !
—"जाईन मंदिरीं    सामसूम झाल्यावरी,
श्रीमुख गोजिरें    न्याहाळीन डोळेभरी,
षोडशोपचारें    देवपूजा मी बांधीन,
गीतांचीं सुमनें    तयावरी उधळीन !
घालीन त्या मिठी,    कंठ करीन मोकळा,
अश्रू हे साचले    वाहवीन घळघळा !
प्रसन्न होईल    भक्तसखा मजवरी,
पुशील आंसवें    नयनींची निज करीं !
देईल विश्वास,    घट्ट उरीं कवळील,
गळ्यांतली माळ    मज कौतुकें घालील !"
—ऐशा आशेनें मी    आलें धावत मंदिरीं,
केलीस ना देवा !    निराशाच माझी पुरी !




कोणाच्या दर्शनें    आता निववावे डोळे ?
कोणा जवळी मी    करूं हृदय मोकळें ?
तुवांच गीतांची    दिली देणगी मजला :

गीतें तीं आळवूं    तुजवीण कवणाला ?
तुझेच यात्रिक    तुझी मूर्ती पळविती,
तुझ्या मंदिरांत    तुलाच न राहूं देती ! ६
धुंडाळावें तरी    रूप तुझें कोठ कोठे ?
तुला शोधावया    जाऊं कोणत्या मी वाटें ?
विफलच यात्रा    तुझें होतां न दर्शन;
यात्रेचा हो मात्र    मज भरपूर शीण !
तुज पळविती    तयां लाभला किरीट !
निर्माल्यही तुझें    माझ्या नाही ना दैवांत ?

---

## शीळ

[ छंद-उद्धव ]

दिवस मावळू दे
  विझू दे निमिषांत
प्रकाश दिवसाचा
  वाढत्या तिमिरांत ! १

दिवस मावळूं दे
  येऊं दे काळरात
रतलें असतां मी
  माळ ही गुंफण्यांत ! २

दिवस मावळूं दे
  ठाकोनी पैलतीरीं
मजशीं घाल शीळ
  वंशींच्या वायूपरी ! ३

दिवस मावळूं दे
  साद ती कानीं येतां
राहील गुंफण्याचा
  हार हा अपुरता ! ४

दिवस मावळूं दे
शीळेच्या धुंदिगुणें
धुंदींत तुजकडे
येईन धुंद मनें ! ५

दिवस मावळूं दे
नवखें पैलतीर
नवखा तसू-तसू
तेथला दूरवर ! ६

दिवस मावळूं दे
ठाऊक तूं कोठून ?
रम्य तूं की तूं उग्र ?
—हेंही रे ठाऊक न ! ७

दिवस मावळूं दे
शीळेच्या धुंदिगुणें
तरीही तुजकडे
येईन धुंद मनें ! ८

दिवस मावळूं दे
साद ती येतां कानीं
पुरती व्हावी माळ
कोठोनी ही गुंफोनी ? ९

# कंटकमाला

[छंद-रक्षा]

—१—

नांव तुझें ऐकोनिया दयाळा ! रंक मी
आलों तुझ्या धामीं.
दारीं दाटी याचकांची मिनली अपार
देणग्यांचा वर्षाव तूं करिशी त्यांवर
मुखीं त्यांच्या चाले तुझा जयजयकार
निनादे अंबर !
तुजपुढे मीही उभा राहिलों येऊन
करांतें जोडून !

—२—

मौक्तिकांचे हार तुवां दिधले कोणाला
कोणा रत्नमाला.
अभागी मी-आस त्यांची धरावी कोठून ?
दे कांहीही : देशील तें घेईन मानून !
नुसतेंच बोलशील मधुर वचन-
धाईल मन्मन !
तितुकेंही पुरे होई मज गरिबाला
जिणें कंठण्याला

—३—

इतुक्यांत घातली तूं मज नवलाची
माळ कंटकांची !
वदशी : "घे अजयाची ही काटेरी माला
तुझ्याजोगी जाणोनिया दिधली तुजला"
"–वैजयंती लाभे यातें !–" कोणीसे बोलला,
उरीं घाव केला !
एकच तों चोहोकडे उठे हास्यध्वनि
गेलों बावरोनी !

—४—

हाच काय मधु बोल ?–हीच का देणगी
तुझी मजलागी ?
'विनोद' हा म्हणूं तरी मर्मच छेदत !
की कसोटी पाहण्याचा असे तव हेत ?
दीनास का लावितात कस अघटित ?
–झालों रे वंचित !–
वैजयंती मानावया कंटकमाला ही
धैर्य तरी देई !

---

## तुटणारा तारा

[ छंद-वंशमणि ]

—१—

निखळून गगनामधून
पडताहे वेगें कोसळून
कोणी तरी अदृश्यच कर
खाली खाली ओढी अनिवार !
दुबळा मी—रोधूं कैसा त्यातें ?
सोडवावें कैसें आपणातें ?
संकटीं या बाहूं कवणाला ?
शक्त तरी कोण तारण्याला ?

—२—

पहा ! माझे सवंगडी सारे
आकाशींचे ग्रह-गोल, तारे
प्रकाशाचा गोफ अंबरांत
अजूनही कैसे गुंफितात !
काय मीच अभागी एकला ?
मुकावें का मींच मत्पदाला ?
नभांतलें स्थान तें पहिलें
दुर्लभच काय आता झालें ?

—३—

क्षण क्षण पतनाची गती
वाढून मी चाललों खालती !
तमोमय पाताललोकांत
पडणार काय खितपत ?
तेज माझें विझून सकल
पाषाणाची कळा का येईल ?
किंवा, तनू जळूनी जाईल ?
मातीलाच माती की मिळेल ?

—४—

रे अदृश्य करा ! कोठे नेशी ?
दया लव नये का तुजशीं ?
नको, ऐसें नको लोटूं तमीं
खराच रे दीन अनाथ मी !
थरकाप होतसे जीवाचा
तोल पुरा सुटला देहाचा !
आळवणी किती करायची ?
आण तरी घालूं कवणाची ?

—५—

परी तुज कणवा ये कैचा ?
तंतू-तंतू तुटला आशेचा !

चंद्रपद नव्हतों मागत,
सूर्यपद नव्हतों वांछित;
माझें मज तारकपद तें
पुरेसेंच खरोखर होतें !
त्यासही मीं वंचित व्हावें ना ?
काय आता सर्वनाशाविना ?

---

## मिणमिण पणती !

[ जाति-लीलारति ]

—१—

गे कले ! तुझा मी पूजक म्हणवी जनीं :
तुज जीवेंभावें सेवितोंहि निशिदिनीं;
वदुं केवि : जाहलों तुझा प्रीतिभाजन
जरि चुकुनी मुकुनी लाभे तव वीक्षण
परि समाधान तें कसें मदंतरिं नसे !
—रे दिव्य जीवना ! तुझेंच जडलें पिसें !

गे कले ! मजशिं तूं सर्वस्वहि अर्पिलें,
नच उमलायाचे वृत्तींचे तरि कळे !
तूं मिळुनहि कोठुन मिळे दिव्य जीवन ?
त्यावाचुन कैसें निवे तप्त मन्मन ?
—रे दिव्य जीवना ! लाभशील केधवा ?
बघ ! तगमग तगमग अक्षय लागे जिवा !

—२—

रे दिव्य जीवना ! अभाव तव आगळा
लव भरुन निघाया उपासितों मी कला
—नच विहरत असतां चंडकिरण अंबरीं
पथिं दिसावयाला पाउल पुढलें तरी

हातांत घेतली पणती ही मिणमिण!
—गे कले! क्षमा करि या उपमेकारण!

रे दिव्य जीवना! तुझा एकही क्षण
मज पुरे व्हावया धन्य जगीं जन्मुन!
कासया कलेचे हवेत शत वत्सर?
—कुरबान असति ते सकल त्या क्षणावर!
—गे कले! जाशि का कोपुन हें ऐकुनी?
रे दिव्य जीवना! तूं तरि ये, ये झणी!

---

# भुलवो जननयनांतें !

[ राग-जंगला ]

भुलवो जननयनातें
        रूपखनी कामिनी;
—परि साधें वदन तुझें
        टाकी मज मारुनी !        १

                रमवाया मज कशास
                        ललित रागरागिणी !
                —शब्दांतच तव साध्या
                        गाण्याची मोहनी !    २

चंचलता नयनींची
        विदित नसो नच जरी;
—साधें हें तव बघणें
        वितरि सुधामाधुरी !        ३

                व्यर्थच त्या सुममाला !
                        —तव करिंची त्यांहुनी
                काडीही गवताची
                        मज सुगंधशालिनी !  ४

साध्या तव पणतीची
उडुलाहि न ये सरी;
सदनींचें–हृदिंचेंही–
तम सारें संहरी ! ५

---

# प्रेमाचा वाटा

( जाति—चंद्रकला )

—१—

सखये ! तूं असशी व्यापुनी माझ्या हृदयाला
त्यांत तसूभरही दुज्याला रीघ न राहुं दिला !
पहा ! दीन जन हे आर्तरव दुःखें करितात
उभें रहायाही स्थळ न त्यां कुठेच जगतांत !
दे थोडी जागा दे तयां उदार मन करुनी
येऊं दे करुणा तयांची विपन्नता बघुनी !

—२—

तुज कर्तव्याची अर्पितों नित्य सुमनमाला
कशी जरी असली प्रियच ती तुझिया चित्ताला !
सर्वच माळेचा परी तूं लोभ गडे न धरी
अनाथांस मिळुं दे तींतलें प्रसून एक तरी !
होतिल त्या वासें अल्प तरि तीव्र गंध कमती
जीवनांत त्यांच्या सदाचे जे भरून असती !

—३—

प्रेम-दीपकाचा माझिया प्रकाश तुज मिळतो
मोद मनांत तुझ्या म्हणोनी डुलतो—बागडतो !
त्या तेजामधला एकतरि आशामय किरण

सत्वर लाभूं दे — प्रियतमे ! गरिबांलागून !
अंतरंगिं त्यांच्या — दाटला निबिड अंधकार
तो तेणें कांही — लोपुनी होइल विरलतर !

—४—

पंचप्राणांचा — वाहिला ठेवा तव पायीं
स्वामिनीच त्यांची ! — —तयांचें करि तूं कांहीही !
एखादाच परी — त्यांतुनी बाजुस राहूं दे
दीनांच्या साठी — तेवढा तरि मज वेचूं दे !
कणही सौख्याचा — लाभला जरि त्यांतें तेणें
धन्य, धन्य होई — खचित मग माझें तुच्छ जिणें !

---

## सारेंच गोड !

[ छंद-तुलसी ]

ऐकाया रात्रीं गोड
जेधवा रातकिडे
गातात चोहोकडे
जनीं-वनीं ! १

ऐकाया रात्रीं गोड
निनाद घंटिकांचा
गाईंचा-वासरांचा
गोठ्यामधे ! २

ऐकाया रात्रीं गोड
आवाज तान्हुल्याचा
झोपेंत हासण्याचा
पाळण्यांत ! ३

ऐकाया रात्रीं गोड
जेधवा परिचित
कंकणें वाजतात
शेजेपाशी ! ४

# विश्वोत्पत्ति

[ छंद-विविध ]

[ सप्तलोकांपलीकडील परमेश्वराचें निवासस्थान. कोटिसूर्यासारखें तेज असलेला परमेश्वर विश्वनिर्मितीनंतर अंमळ विश्रांति घेण्याच्या विचारांत आहे. पलंगांत त्याच्या रंजनासाठी चार वाणी मधुर स्वरांत गाऊं लागतात. ]

—वाणी १ ली—

दिव्य स्वरांनो ! दिव्य भावांनो ! व्हा रे सन्मुख :
आम्हांत मिळा रमवावया विश्वजनक !
दिव्य स्वरांनो ! आळवा तुम्ही गाण्याचे सूर,
दिव्य भावांनो ! वाहूं द्या त्यांत भक्तीचा पूर !

—वाणी २ री—

दयाळा ! विश्वाची रचना पाहून
कल्पना स्फुरते यापरी नवीन :
संगीताची गोडी फार तुझ्या मना
म्हणून विश्वाची केली रुद्रवीणा—
ग्रहांचे जोडिले तुंबे परोपरी
कर्षणाच्या तारा लावियल्या वरी !
ज्या करांगुलीला शोभे लख लख
चंद्रकोरीचें हें इवलेंसें नख—
तिनेच त्या तारा छेडिशी सतत,
नीरवतेची तूं वाजविशी गत !
अनंत ती वीणा ! अनंत ती गत !
अनंततेमधे भरली अनंत !

—वाणी ३ री—

निराकारा ! रमविशी मन
इच्छामात्रें साकार होऊन,
बोलून—हासून !
आकार तूं घेशी जसा-जसा,
निर्माण हो प्राणी तसा-तसा;
बोलतां तूं—भाषा निपजती,
हासतां तूं—कलांची उत्पत्ति
हो त्या त्या जगतीं !

* * *

मानवांचें रूपडें रेखीव
एकदा तूं घेशी अभिनव
—थक्क दैत्य-देव !—
अर्ध नर, अर्ध नारी त्यांत
—स्त्री-पुरुष-भेद तेणें होत !
त्यांतूनच अतिमानवाचा
मर्त्यलोकीं विकास व्हायचा
हेत हा ईशाचा !

—वाणी ४ थी—

दिव्य स्वरांनो ! दिव्य भावांनो ! पावा विराम :
विश्वजनक करूं पाहतो आता आराम !
तृण असूं द्या, असूं द्यात कीं उज्ज्वल तारे,
प्रभूने जें जें सृजिलें तें तें दिव्यच सारें !

# अनलज्वाला

[ मुक्तछंद ]

स्वतंत्रते ! तूं मोहक !—दाहक—
—मोहकता तव कुणा न मोही ?—
कोटि कोटि जन तुला विमोहुन
स्वतांस भुलले, पूजक बनले, पूजनिं रतले :
प्रेमाश्रूंनी तुला न्हाणिती,
भावसुमांनी तुजशिं नटविती,
नाचत गाती तव जयगीति—नभ निनादिती !

परि तव देवी ! दाहकताही कुणा न दाही ?
कोटि कोटि जन जे तुज भुलले—तुझेच झाले—
तुझ्या पूजनीं रंगुन गेले—भान विसरले—
त्यांसच ज्वाला तुझ्या वेढिती—लपेटताती—
जाळति—पोळनि—राख बनविती !

अनलज्वाला दुरुनच मोहक—नयनाल्हादक—
परंतु तिजला प्रेमोन्मादें कवळूं जातां
दग्ध करी ती !—नच तिला क्षिती !—कुठली खंती ?
—स्वतंत्रते ! तव अशिच असे गत !

ज्वाला जाळो !—अथवा पोळो !—
तिज भुलल्याविण राहिल कोठुन शलभमालिका ?
तिच्यावरी ती झेपांवरती झेपा घेते !—
हासत हासत जळुनी जाते !—तन्मय होते !

# कल्पनेंतला ताजमहाल

[ जात-अचलगति ]

ताजमहाला ! तुजलागी
पाहिलें न मीं अजुन जरी;
तरिहि न आतुर मम नयनें,
हुरहुरही नच मदंतरीं !
"जगावेगळा अनुभव हा !"
—म्हणशिल तूं मज उपहासें !
वद कांहीही !– सत्यच हें !
तुजशिं अन्यथा कथिन कसें ?
अवगणना तव करावया
परि तुज सांगत हें नाही :
अवमानाया सौंदर्या
धजतिल नच रे सुरवरही ! १

  

ताजमहाला ! तूं दिससी
कल्पनेमधे नित्य मला :
कल्पनेंतलें दर्शन तें
वर्णवे न मम वैखरिला !

दिव्यत्वाची तयावरी
गूढ-रम्य छवि झळझळते;
—स्वप्नच सुंदर तद्रूपें
आकाराला की येतें!
मयसभाहि ती त्यापुढती
चूरच व्हावी लाजोनी;
ताजमहाला! मग तुजला
तुळा तयाची ये कुठुनी? २

  

कल्पनेमधे कुरूपता
सुंदरतेचें रूप धरी :
नवल कशाचें, सुंदरता
सुंदरतर हो तींत जरी?
मंद मंद ही दिसणारी
वास्तवांतली चिनगारी
कल्पनेमधे बने क्षणीं
चांदणीच चमचमणारी!
आणि, कल्पना लवलाही
वास्तवांतल्या तारेतें
चढवितसे झगमगणाऱ्या
चंद्रपदाच्या मुगुटातें! ३

  

नसो नसे मीं देखियलें
ताजमहाला ! तुज अजुनी,
सांग तूंच परि सांग अता
खंत कासया करूं मनीं !
सौंदर्याचा तुराच तूं
यांत न शंका मला जरा;
कल्पनेंतली छबी तुझी
परंतु शतगुण चारुतरा !
प्रत्यक्षीं तुज पाहुनिया
तसाच व्हावा हर्ष कसा ?
कल्पनेंत मी म्हणुन तुला
स्मरुनी होतों खुळा-पिसा ! ४

---

# सोहाग-रात

## ऐतिहासिक खंडकाव्य

[ जाति—**अनलज्वाला** ]

[ **कथासूत्र**:—गनोरच्या लावण्यवती गौरीराणीच्या अभिलाषेने पठाण सरदार दाऊदखान याने तिच्या पतीशीं—गनोराधिपतीशीं—दोस्तीचा बहाणा करून गडावर मुक्काम केला व कपटाने त्यास ठार मारिलें. पुढे खानाने राणीला मीलनाची निकड लाविली असतां तिने प्रथम त्याचा नाश करून नंतर त्याच्या सैनिकांकडून विटंबना न व्हावी, पतदर्थ, स्वतःचेंहि बलिदान केलें !]

—१—

गौरीलागी दाउद पाठवि पत्र यापरी :
"तुझ्याचखातर दिधल्या दाला गनोरावरी !
ऐकत होतों तव रूपाची नित्य अवाई
मन्मथ माझ्या हृदिं पाऱ्यापरि डोलत राही !
गड सर केला ठार मारुनी तव पति काफिर,
झालों आहें आलिंगाया तुजला आतुर !
गनोर हो मम, तूंही तेविंच हो जन्मवरी :
सोहाग अजी रात उभयतां करूं साजरी !"

कळवी राणी, "दुर्ग जेधवा जिंकियला मम
तेव्हाच पदीं वाहियलें मीं प्रीतीचें सुम !
पाठवीतसें मीलनसूचक पोषाखातें :
लेवुनिया तो यावें रात्रीं प्रासादातें !"

—२—

संध्येची मधु लाली लागे तमिं मिसळाया,
घडिभर रांगे विश्वावरती पिंगट छाया :
अवकाशाच्या बिळाभीतरी रजनी-सर्पिण
धूसर धूसर कातच, वाटे, देई टाकुन !
निज दलबादल डेऱ्यामाजी दाउद हर्षुन
करि गौरीचीं बहुमोलाचीं वस्त्रें धारण :
थाटच न्यारा देहावरल्या अंगरख्याचा
कटिस चोळणा, विळखाच जसा 'त्या' बाहूंचा !
विलसे त्याच्या शिरीं भरजरी टोप तुऱ्याचा,
करकरणारा चढाव पायीं वेलबुटीचा !
सुरमा रेखी नयनिं सळइने कोरुन कोरुन,
तांबुस दाढी दुभंग अपुली करी विंचरुन !
स्वतालाच तो भुले दर्पणीं बघुन छबीशीं :
कंठा मिळवी आयन्यास जी दावी दासी !
म्हणे मनाशीं, "पोषाखच जर इतुका सुंदर,
असेल तर ती धनीण त्याची किती चारुतर ?"

—३—

शिंगें-कर्णे दाऊदाच्या तंबूपुढती
नगाऱ्याचिया ध्वनींत अपुला ध्वनी मिळविती.
मशालवाले उभे त्या स्थळीं हारोहारी :
तिमिर तेथुनी पळुन बैसला जाउनी दुरी !

सेवक होता एक धरुनिया वारू अबलख
भरगच्चीचा जीन ज्यावरी शोभे लखलख
नटुनी थटुनी दाउद आला डेऱ्यामधुनी
जयजयकारें सवेंचि गेलें अंबर भरुनी !
ठेवि जेधवा पद तुरगाच्या रिकिबीवरती,
एकसरें तों बंदुकींचिया फैरी झडती !
टांच मारितां ठुमकत ठुमकत अश्व निघाला,
प्रासादाच्या द्वारापाशीं क्षणीं ठेपला !

—५—

विलास नांदे मूर्त महालीं सौधावरती :
ठायीं ठायीं सौरभशाली दीप तेवती.
अंथरले लव-दार गालिचे तेथ मुलायम,
उंच आसनें दोन मांडिलीं वरति मनोरम—
एकातें करि सनाथ दाउद यवन-वीर-वर,
लावण्यखनी मनोरमहिषी बसे दुज्यावर.
शहामृगाच्या कोशासम तनु निस्तुल गोरी,
केश सुगंधित काळे काळे जशि कस्तूरी !
चुनडि केशरी खुले, केशरी तशीच चोळी,
—यज्ञवेदितें अनलज्वाला की लपेटली !
वरचेवर तिज दाउद निरखी तृषित लोचनीं :
"हूरच भूवरि येइ !"—वदतसे चकित होउनी !

करूं लागल्या रम्य नर्तकी गायन-नर्तन

सारंगीच्या सुरांत अपुला सूर मेळवुन.
धिकि धिकि शब्दें मृदंग धरितो ताल सारखा,
ठेक्यावरती पाय तयांचा पडे नेटका.
मणिमय वेणी जल-लहरि-परिस नाच-नाचते
पाठिस लागे जणूं त्यांचिया मोहुन त्यांतें !
"वा ! वा ! खाशी !-" बोले दाउद मान डोलवुन
एक रमणि त्या मद्यें पेला देइ भरभरुन.

संगीतापरि भरास आलें मदिरा-सेवन,
रंगु लागला अनंग त्याच्या अंगांगांतुन !

—५—

म्हणे, "जिवलगे ! वेळ वाउगा कां घालविशी ?
अधीरतेची माझ्या नच का पर्वा तुजशीं ?
तव सौंदर्यें केलें आहे वेडें पुरतें :
उपचार दुजे कशास हे मज भुलवायातें ?
एकेक तुझा बोल लाजविल मंजु गायना—
ऐकवूनिया सार्थ माझिया करी जीवना !
अधररसाची शराबासही सर ये कैशी ?—
चाखवून तो तुच्छ गणूं दे स्वर्गसुखांशीं !
विलंब कां मग ?-चल लवलाही शयनमंदिरीं !"
—नर्तकींप्रती तिथून जाया खुणावी करीं !

पटपट बदलति भाव गौरिच्या वदनावरचे
—रंग बदलती जैसे स्वाती-नक्षत्रींचे !

आणि, तन्मुखीं झुंज चालली अटीतटीची
बळेंच आल्या स्मितासंगती संतापाची !
हार जयश्री घाली शेखीं स्मितालागुनी
कोयळापरी बोले गौरी मंजुळ वाणी :
"आपुलीच मी झाल्यें आहें दासी आता,
हसें करुन कां घेतां दावुन मदनविवशता ?
आणियल्या मीं नाचणारिणी निवडुन-वेचुन,
कसब आणखी थोडें त्यांचें घ्यावें पाहुन !
शृंगाररसा उरली आहे अमुप शर्वरी !"
—ऐसें वदुनी आसनावरुन उठली गौरी :
लाजत-मुरकत दाउदाजवळ हळूच जाई,
स्वता तयाचा पेला मद्यें भरुनी देई !

पुन्हा नर्तकी घेउं लागल्या तान सुधोपम,
चाल चरणिंचे वाजती पुन्हा रुमझुम-रुमझुम !

—६—

तोंच कोसळे दाउद : विटपच जणु उन्मळला :
गडबड-गडबड भुइवर लागे लोळायाला !
"कां हो अवचित सर्वांगाची लाही लाही ?
व्याकुळ होउन जीव कां असा जाऊं पाही ?
जादूटोणा काय मजवरी केला कोणी ?
दगा करी की राणी ?"—कष्टें म्हणे कण्होनी !

वादन कैचें ?–गान कोठचें ?–नाचहि कुठला ?
विलीन झाली नीरवतेमधि संगीतकला !
गौरीची लव नुरे मघाची हास्य-माधुरी,
लोळ विजेचे उठति तियेच्या लोचनांतरीं !
उपसुन हातीं घेइ दडविल्या खंजीरातें :
अनुसरताती चतुर नर्तकी निज महिषीतें !
फुलमाळेसम कोमल अवघ्या प्रथम भासल्या,
–त्याच कामिनी बनति नागिणी क्षणीं खवळल्या !

कडकडली मग गौरी, "नीचा ! घे ऐकोनी :
मरणघडी तव खचित ठेपली जवळ येउनी !
पोषाख असे तुझा माखिला तीव्र विषाने
तें तव देहीं भिनुनी जावें पूर्णपणाने–
म्हणुनी आम्ही नर्तनादिकीं समय दवडिला
–देवदयेने हेत आमुचा सफल जाहला !
तेणें तुझिया अंगीं वणवा असे पेटला
–दीपराग हा तुझ्या विनाशें तुला गाइला !
सोहाग अशी रात अलौकिक अजुन साजिरी
नसेल झाली कधिच कुणाची मेदिनीवरी !"

लोळत-विव्हळत बोले दाउद, "पापरूपिणी !
पठाण माझे घेतिल याचा सूड उगवुनी !
पहा ! येथुनहि दिसेल तुजला शिबीर माझें

झगमगताहे रोषणाइने मीलनार्थ जें;
सैनिक तेथे रंगीं असती दंग होउनी
झालिस माझी बटीक ऐसें मनीं भावुनी !
परंतु केला घात यापरी तूं कपटाने–
समजतांच हे, न्हातिल तुझिया ते रुधिराने !"

गौरी गर्जे पुन्हा, "यापुढे सूड कोठला ?
दारूने मम महाल सारा आहे भरला !
उडेल भडका पळांत तिजवरि ठिणगी पडुनी :
प्रासादासह जाऊं आम्ही राखड बनुनी !
जोहाराने क्षत्रियकन्या वरिति मरणगति :
पतिलोकातें पावुन धन्या होती अंतीं !
सूडाची मग उगिच जल्पना करिशि कशाला ?
मींच मात्र रे अपुल्या पतिचा सूड उगविला !"

"घे ! घे !"–म्हणुनी गौरीलागी मारायाला
दाउद उठला, परि कोसळला तोंच धरेला !
डोळ्यांपुढती एकसारखी ये अंधारी
"क..प..टी..के..व..ळ..!" तुटक तुटक तो वदे वैखरी !

चिडुनी बोले, "मलाच कपटी कशास म्हणशी ?
मुगुटमणी तूं कपटपटूंचा काय न असशी ?
चिरकाल तुवां आसक्ती मम काय न धरिली ?

पतिशीं माझ्या वरवर मैत्री काय न केली ?
अतिथी म्हणुनी आलास न का गनोरावरी ?
हरिले नच का तत्प्राणधना तुवां तस्करीं ?
काय न येशी इथे तूं मला भ्रष्टविण्याला ?
—त्वत्कपटांची दीर्घतरा ही काय न माला ?
कां न योजना करूं कपटाची तव कपटावर ?"
—वदतां वदतां कोप तियेचा होइ अनावर !
निमिषोन्मेषीं दाउदावरी चालुन गेली—
उरीं तयाच्या चकचकणारी कट्यार घाली !
नर्तकीहि निज खंजीरांची तृषा शमविती :
विझुनी गेली दाऊदाची प्राणज्योती !

"चला, पेटवूं दारू !"—म्हणतां गौरी राणी
गर्जत 'हरहर !'—जाती अवघ्या सौधावरुनी !
भीषण झाला स्फोट : उठावें प्रेतहि दचकुन :
दाखवीतसे विराट अपुलें रूप हुताशन !
जिभा तयाच्या भिडूं लागल्या नभोमंडला,
"सूड ! सूड !"—ये शब्द त्यांतुनहि ऐकायाला !!

---

## पऱ्यांचें गाणें

[ जाति-**भरतखंड**]

पसरतां भुवनिं यामिनी
अम्हि नंदनवन सोडुनी
कर करांमधे गुंफुन
हिंडतों जनवनांतुन !
पथिं इवले इवले दिवे
जन म्हणति तया काजवे !
—ही अजाणता पाहुनी
गुदगुल्याच होती मनीं !
**किति बाई ! मानव खुळे !**
**त्यां इतुकेंही नाकळे !** १

* * *

अमुच्या घन अलकांतिल
किति उन्मादक परिमल !
झड गंधवाह घालुन
दिशिं दिशिं तो ने वाहुन !
—परि गमे जनांलागुन
फुलवाडी ये बहरुन :
एकेक तींतलें सुम
विखरितें गंध घमघम !

**किति बाई ! मानव खुळे !**
**त्यां इतुकेंही नाकळे !** २

* * *

हा इथे दंग वादनीं,
तो तिथे गुंग गायनीं
स्वनिं उभय आपुले स्वन
ओतितों तया नेणुन !
—म्हणुनीच मधुरता खुले !
—हें जनां कळे कोठलें ?
ते वानिति त्यांसच परी !
कुठवरी हसावें तरी ?
**किति बाई ! मानव खुळे !**
**त्यां इतुकेंही नाकळे !** ३

* * *

झोपल्या मानवांचिया
शेजेशीं जावोनिया
प्रीतिचा मंत्र मोहन
पुटपुटतों कानांतुन !
मग गोड गोड कांहिसें
झोपेंत त्यांजला दिसे :
ते 'स्वप्न' तया बोलती
—मूढतेस नाही मिती !
**किति बाई ! मानव खुळे !**
**त्यां इतुकेंही नाकळे !** ४

# तोच गीत ऐकितो !

[ जाति-सूर्यकला ]

—१—

"तरुवरती बैसुनी, बुलबुला ! रात्रभरी जागुनी
कंठांतिल साजिरी, घुमविशी गाण्याची बासरी !
परंतु अवनीवरी, राज्य बघ ! संप्रति निद्रा करी :
गीत न कुणि ऐकितें, कुणि न तें ऐकुनीहि वानितें !
गाना तव यायचा, सांग मग अमरपणा कोठचा ?
उगिच गळा सुकविशी, जागुनी उगिच नयन शिणविशी !"

—२—

"न का तुम्हां ठाउक, असे मी रात्रीचा गायक ?
बुलबुलकंठांतुनी, गीततति कधी निघाली दिनीं ?
निशेचिये अवसरीं, लकेरी घेत लकेरीवरी
गानकला सेवितों, जीव मम नादरसीं बुडवितों !
न मिळो न मिळे जरी, झोप मज रात्रींतुन पळभरी
त्यजूं कसें गायन ?, ओघ हा कसा अडे अडवुन ?

"निद्राकुल जाहलें, जन-विजन पेंगाया लागलें :
गाणें लाखांतुनी, ऐकुं ये एखाद्यालागुनी !

तोहि गुरफटे परी, स्वताच्या सुखदुःखाभीतरी–
गीत केवि हृदिं ठसे ?, –ऐकुनी न ऐकिलेंसें जसें !
फार काय ?–मजशिंही, नाठवे गातों जें प्रत्यहीं
यातें भंगुरपणा, म्हणतसां तरी सुखानें म्हणा !

"विश्व जयें निर्मिलें, जयाने तेज उडुगणा दिलें
सौरभ जो दे फुलां, तोच ही वितरी मजला कला !
प्रेरितसे मन्मना, म्हणोनी करितों मी गायना–
तोच गीत ऐकितो, स्मरणही कल्पवरी ठेवितो !
–पर्णहि जरि हाललें, तरी तें जाइ न कधि विसरलें !–
भंगुरता ही गणूं ?, अमरता अथवा यातें म्हणूं !"

# गवती फूल

[ राग–भीमपलास ]

गवताचें फूल
वात देई डोल
–चित्तही विलोल ! १

कैसें तया वर्णूं ?
किती साधें म्हणूं ?
–साधा अणूअणू ! २

कसें जन्मा येतें–
कैसें उमलतें–
न कळे मतीतें ! ३

जरी कळों येई,
विश्वाचें गूढही
'गूढ' नच राही ! ४

जी शक्ती विश्वास
आणी आकारास,
तीच या फुलास ! ५

# देवमान्य

## बौद्धकालांत कल्पिलेली कथा

[ छंद-गजवदन ]

—१—

यज्ञ शंभरावा होतांच पुरता<br>
गमे भूपा झाली जन्मसफलता !<br>
कुणा दे दक्षिणा, कुणा देई भूमि,<br>
याचकां संतुष्ट करी अंतर्यामीं !<br>
घडविली तेणें यज्ञपुरुषाची—<br>
कलाकुसरीची प्रतिमा सोन्याची :<br>
"मिरवून मूर्ति नगरामधून<br>
वैभव आपुलें सकलां दावून,<br>
शंभर यज्ञांचें स्मारक म्हणून<br>
होत्यालागून ती करावी अर्पण;<br>
—प्रथा अभिनव होईल ही खास,<br>
नांव लौकिकही येईल भरास !"<br>
—यापरी योजिला भूपाने विचार<br>
डामडौलाची त्या हौस अनिवार !<br>
त्याच मूर्तीची ही पालखी निघाली—<br>
नगरांत तीच धांदल सगळी !

—२—

पहा ! उभारिलीं पताका-तोरणें
मार्ग संमार्जिले जान्हवीजलानें;
यज्ञनारायण शोभे पालखींत,
सामगायनातें ब्राह्मण गातात.
पादचारी भूप चवरें वारितो,
मंजुळ मंजुळ चौघडा झडतो.
दो बाजूंस पथीं सैनिक चालती,
पालखीशीं कोणा रिघों नच देती !
दर्शनार्थ जन लोटले अमित :
दुरूनच देवा भावें नमितात !
"धन्य नृपवर !"– करिती ते ध्वनि
–हरिखून तेणें भूप म्हणे मनीं :
"मजसम कोण भुवनीं दुसरा ?
पुण्यश्लोकांत मी पुण्यश्लोक खरा !
अमर सुमनें कां न उधळिती ?
काय कल्पतरु सुकला संप्रति ?
नुधळोत सुखें नुधळिती जरी,
ठसलों जनांच्या हृदयाभीतरी !"

—३—

इतुक्यांत एक कुष्ठें पीडिलेला
पालखीजवळी जावया सजला !

"पैस रे द्या वाट ! अडवा न कुणी !
टेकवूं द्या माथा प्रभूच्या चरणीं !
स्पर्शें त्याच्या भोग हरतील सारे !"
—ऐसें वदून तो पुढे—पुढे सरे !
—कोण हें साहस !— भूप खवळला !
"मारा पातक्यातें !"— सैनिकां बोलला !
तळपूं लागल्या नग्न तरवारी,
श्रमण ये कुणी तोंच तीरापरी,
गलितांगालागी झाकी निज देहें—
हासत हासत घाव साहताहे !
क्षणीं होतीं त्याचीं खांडोळीं—खांडोळीं
—सुरीं नभांतून सुमवृष्टि केली !
कोठला तो कुष्ठी ?— यज्ञनारायण
स्वयं प्रगटला त्याच्या देहांतून !
म्हणे, "राया ! भूल पडली तुजला :
यज्ञांत—मूर्तीत— असेन कोठला ?
रंजल्या-गांजल्या दीनांचें शरीर
आम्हां देवतांचें हेंच रे मंदिर !
मीच झालों कुष्ठी सत्त्व पाहण्याला—
भिक्षूवीण नये कुणीच कसाला !
पहा ! कैसा मान्य हो देवांलागून—
स्वर्गांतून तया येतसे विमान !"
—आलें यान तदा वेगें धरेवरी :

श्रमण जाहला दिव्यदेहधारी,
यज्ञनारायणा करून वंदन
बैसतां विमानीं, तें गेलें उडून !
—पुष्पवृष्टि पुन : करी सुरगण
पावे अंतर्धान यज्ञनारायण !

---

# पऱ्यांची नगरी

[ मुक्तछंद ]

**बालक :** "पथा! पऱ्यांच्या नगरीला कधि नेशि मला?
कथा ऐकिल्या त्या नगरीच्या नवलपरीच्या :
म्हणती तेथे नच ये कानीं दुजा ध्वनी–
मधु हास्याविण, मधु गीताविण पऱ्यांचिया
झळझळ झळझळ झळके नगरी कौमुदीहुनी अद्भुत छविने!
–जवळच तेथुन वसे स्वर्ग तो–नंदनही तें–
–नंदनांतल्या दिव्यौषधिंची द्युति ती–कृति ती!
जरा न तेथे, मरणहि नाही, दुःखाचें मग नांव कशाला?
अक्षय यौवन, अक्षय मोदहि तिथे नांदतो!
परंतु जातां प्रौढ कुणि तिथे नगरी विरते–
–पऱ्या लोपती!–हास्य संपतें!–गायन थिजतें!
तथापि तेथे बाळें जातां दृष्ट न त्यांची नगरिस लागे :
गुप्त न होई, लया न जाई!
–ऐशा मौजा नित्य ऐकितों–ऐकुन डुलतों–
म्हणुनी आतुर जाण्याला त्या नगरीला
ने, ने तेथे ने मजला."

**मार्ग :** छे छे, कैसें त्या नगरीला नेउं तुला?
पिंडच माझा स्थूलाचा–नच सूक्ष्माचा!–

सूक्ष्माला तुज न्यायाला मी क्षम कुठला ?
इहलोकांतिल कुण्या नगरिला, वा हाटाला, वा सदनाला
नेण्याला मी सज्ज सदा !
परंतु जाणें असे पऱ्यांच्या नगरीला जर
अक्षय यौवन मिळवायाला–
हास्यीं, गानीं गुंगायाला–
आनंदाला लुटावयाला–
जरा, मरण हीं चुकवायाला–
तर कां येशी व्यर्थ मजकडे सत्त्वच माझें हरावयाला ?
जड जगतांतिल मी जड वीथी–
आस धरिशि तूं जोंवर माझी–रे जडतेची–
विसर '**पऱ्यांची नगरी**' तोंवर !

---

# नंदनवन मुकल्यावर !—

[ छंद—लवंगलता ]

[स्वर्ग व पृथ्वी यांजमधील रस्ता. चहूंकडे घोर अंधार पसरला आहे. नंदनवनांतून हाकून दिलेलें **ॲडॅम** व **ईव्ह** हें पहिलें मानवदांपत्य त्या रस्त्यावरून पृथ्वीवर चाललें आहे. नंदनवनांत रात्र नसल्यामुळे पूर्वी कधीहि त्यांच्या अवलोकनांत अंधार आला नव्हता. यामुळे त्याच्या त्या विराट् प्रथम दर्शनाने तीं उभयतः अतिशय भयविव्हल झालीं आहेत ! ]

**ईव्ह** (थरथरत)

तम केव्हा सरे ?

**ॲडॅम** (निःश्वास सोडून)

—हाय ! केव्हा तें सरेल !
धडधडे ऊर, वाटे, आताच फुटेल !
झाक मुख केशीं, मीही झाकीं एका हातें :

[ ईव्ह घनदाट मोकळ्या केसांनी व ॲडॅम उजव्या हाताने तोंड झाकतो. ]

—तमोभय हो कमती मिटतां नेत्रांतें !
राहूं दे हा दुजा कर कटीस गुंफून—

[ ॲडॅम डाव्या हाताचा ईव्हच्या कमरेभोवतीं विळखा घालतो. ]

**ईव्ह** (स्फुंदत)

अंतच न देवा ! का रे तिमिरालागून !

  

**ईव्ह** (थरथरत)
तम केव्हा सरे ?
**ॲडम** (निःश्वास सोडून)
—हाय ! केव्हा तें सरेल ?
सेवियेलें नेणूनिया ज्ञान–तरु–फल :
लोटुन तूं देशी विभो ! नंदनामधून !
—तिमिरांत गवसलों !—वाटही नवीन !—
**ईव्ह** (थकलेंसें करून)
—शीण तरी किती देहीं चालून चालून !—
**ॲडम** (सद्‌गदित कंठाने)
अंतच न देवा ! का रे तिमिरालागून ?

ॐ ॐ ॐ

**ईव्ह** (थरथरत)
तम केव्हा सरे ?
**ॲडम** (निःश्वास सोडून)
—हाय ! केव्हा तें सरेल ?
कैचें पुन्हा तेजोमय नंदन दिसेल ?
**ईव्ह** (आशाळभूतपणाने)
त्यावाचून सर्वत्र का तम नित्य राही ?
—जातसों ज्या मेदिनीतें असे का तेथेही ?—
**ॲडम** (निराशेने)
धाडिता का प्रभु तेथ आपणां त्यावीण ?

**ईव्ह** (स्फुंदत)

अंतच न देवा ! का रे तिमिरालागून ?

* * *

**ईव्ह** (थरथरत)

तम केव्हा सरे ?

**ॲडॅम** (निःश्वास सोडून)

—हाय ! केव्हा तें सरेल !

**ईव्ह** (कानोसा घेऊन)

दुरून ये कशाची ही कानीं किलबिल ?

—नवेंच हें दयामया ! साकडें कसलें ?

**ॲडॅम** (उसनें अवसान आणून)

पाहूं का मी उघडून नयन आपुले ?

**ईव्ह** (अधीरतेने)

—छे, छे, नको राजसा ! रे जाशील भिऊन !—

**ॲडॅम** (सद्गदित कंठाने)

अंतच न देवा ! का रे तिमिरालागून ?

* * *

**ईव्ह** (थरथरत)

तम केव्हा सरे ?

**ॲडॅम** (निःश्वास सोडून)

—हाय ! केव्हा तें सरेल !

**ईव्ह** (जास्तच भिऊन)

किलबिल ये जवळ!...काय हें असेल?...

**ॲडॅम** (कष्टाने धीर धरून)

बघतोंच–

[ पाहतो, तों सकाळ झालेली दिसते. हर्षातिरेकाने तो ईव्हला घट्ट आलिंगन देतो ! ]

अहा ! फुटे तेज !...खग गाती ! ...
मही का ही ?...तमच न येथ !...

**ईव्ह** (डोळे उघडून आनंदानें)

–सरे अंतीं !–

[ पण हा आनंदाचा झटका लगेच ओसरून ती पुन्हा खिन्न होते ! ]

परि त्याची स्मृती सख्या ! राहील मनांत
तेजाहूनही अधिक !–

**ॲडॅम**

[ ईव्हच्या भाषणाने नुकत्याच पाहिलेल्या अंधारची दुःखद आठवण जागृत होऊन ॲडॅमहि तिच्यासारखाच पुन्हा खिन्न होतो ! ]

–तीच मम गत !

   

# विरामक (Epilogue)

**तेजांतील ईश्वराचा अंश**

[ **ॲडम व ईव्ह** यांची तिमिरच जास्त आठविण्याची प्रवृत्ति पाहून पृथ्वीवर प्रगट झालेल्या दिवसाच्या तेजांतील ईश्वराचा अंश सखेदाश्चर्याने स्वगत बोलतो. ]

होऊं नये तें जाहलें !–

**तिमिरांतील सॅटनचा अंश**

[ तेज प्रगट झाल्यामुळे पृथ्वीवरून पळून गेलेल्या, पण दिवसाची मुदत सरतांच रात्रीच्या वेळीं पुन्हा आपलें साम्राज्य पृथ्वीवर प्रस्थापित करण्याची संधि साधण्यासाठी तेजाच्या पाठीशींच अनंत अवकाशामध्ये दडून बसलेल्या तिमिरांतील सॅटनचा अंश तेजांतील ईश्वरी अंशाला ऐकूं न जाईल अशा रीतीने त्याच्या दर वाक्यागणिक प्रत्युत्तरात्मक असें भाषण करतो. ]

(–व्हावें तेंच झालें !–)

**तेजांतील ईश्वराचा अंश**

मानवांतें तेज जरी दिसूनिया आलें,
तेजाधिक तमच त्यां आठवे तरीही !

**तिमिरांतील सॅटनचा अंश**

(–निकेंच हें !–)

**तेजांतील ईश्वराचा अंश**

–झटेन मी लोपाया वृत्ती ही !

**तिमिरांतील सॅटनचा अंश**

(मीही न कां झटेन ती कराया अक्षय ! ३९

  

–समरभू हो इथून मानव-हृदय ! )

# प्रतिध्वनि

[ जाति-जीवनलहरी, अर्ध ]

—१—

या दरींत
त्या दरींत
किति नीरव
होई तव
पडसादा !
वास सदा !

हो जेव्हा
रव केव्हा
वाऱ्याचा,
पक्ष्याचा,
हाकेचा,
पाण्याचा,
—खडबडुनी
दचकोनी
तूं उठशी,
बावरशी—
तेच बोल

सुटुन तोल
घोळतोस,
घोकतोस !

फिरुन फिरुन
ते ऐकुन
घ्यावे कुणि
हृदिं ठसवुनि-
अनुकारुन
प्रिय-जन-मन
खुलवावें,
डुलवावें !

—२—

हृत्कुहरीं
याचपरी
तव नीरव
करि अभिनव
पडसादा !
वास सदा !

चुकुन मुकुन
भाग्य फळुन

त्रिभुवनांत
फिरत फिरत
हृत्कुहरीं
माझ्या जरि
सुंदरता
अमरनुता
क्षण आली,
क्षण ठेली,
कुजबुजली
मंत्रावलि
—तरि जागृत
हो क्षणांत !
घोक–घोळ
तेच बोल !

फिरुन फिरुन
ते परिसुन
मनिं ठसविन,
कवनिं कथिन :
रसिकार्चन
मग साधिन !

# दोन सुवास

[चाल-फेराची]

तूं-मी मिळुनी
जाऊं विजनीं
राहूं तेथे जगा विसरुनी ! १

जादुगारिणी
वनदेवि कुणी
असेल रानीं निवास करुनी २

तिजला ध्याऊं,
तिजला गाऊं-
हवेत ते वर मागुन घेऊं ३

प्रसन्न होइल,
वांछा पुरविल :
तुला-मला ती सुवास बनविल ! ४

कंटक कुंठले
मग जगांतले !
कोमल कोमल शेज सुमदलें ! ५

या भ्रमराला
त्या भ्रमराला
मधुची वार्ता कळवायाला– ६

दोघे मिळुनी
फिरूं जनिं–वनीं
प्रभंजनाच्या पंखांवरुनी ! ७

फिरतां फिरतां
मीलन घडतां
खरोखरीची एकरूपता ! ८

गंध मिसळले
एक जाहले
अलग पुनरपी होतिल कुठले ! ९

जड देहाची
अशी कोठची
परस्पर मिठी पडावयाची ? १०

## मनीषा

[ जाति–पादाकुलक ]

सागरांतलें पाणी तोडित,
कर्कश कर्णे फुंकित फुंकित–
साम्राज्यास्तव बलहतांवरी
बलोद्धतांच्या निघति रणतरी ! १

वाटे मजला सागर व्हावें,
तरींस थोडें वाहुन न्यावें–
विशाल जबडा अवचित पसरुन
उदरीं त्यांतें घावें लोटून ! २

* * *

विमानेंहि नभिं मंडळ घेतीं :
एक, दोन–छे ! व्यर्थच गणती !
रणतरींहुनी ये दुबळ्यांवर
हें 'अस्मानी' संकट गुरुतर ! ३

वाटे मजला अंबुद होउन,
करीं विजेचा आसुड घेउन–
एकामागुन एक विमानें
विलया न्यावीं झडपुन तेणें ! ४

## बुद्धाच्या अस्थींस–

[ छंद–' अक्षरलेखा ' बृहती ]

—१—

स्तूप येथे दिसतो डोळां
बौद्धांचिया युगामधला
स्तंभ किती भव्य हा असे !
–खोदकाम लावितें पिसें !
"धन्य, धन्य कलाचातुरी !"
–मुखांतून निघे वेखरी !

—२—

स्तूपातळीं खोल भूमींत
सुवर्णाच्या रम्य पात्रांत
बुद्धाचिया अस्थी पावन
असतील दिल्या ठेवून;
स्तूपमूल भक्त म्हणून
पूजितात फुलें वाहून.

—३—

अस्थींनो ! त्या अवताराचा
अंश तुम्ही आहां चिदाचा !

केवि मग न आकळत
          विश्वशांती आली भंगत ?
चेत आणा खडबडून,
          प्रगटूं द्या बुद्धालागून !

—४—

घुमवून शांतीची वेणू
          विमोहील तो अणूरेणू !
दिव्य सूर कानीं येऊन
          लोभादिक धरेवरून–
पळतील दुरीच्या दुरी :
          मंत्रयोगें भुतें ज्यापरी !

---

## पांखरूं उडालें !

[ राग-मांड ]

कां उडुन पांखरूं हें गेलें ?–ध्रु०

अज्ञातांतुन–अंधारांतुन–
काय निमंत्रण त्या आलें ? १

गंधर्वांचे रव गाण्याचे
कानांवरती कां पडले ? २

सूर्यफुलाच्या, चंद्रफुलाच्या
सुगंधास कां तें भुललें ? ३

काय येथल्या खोप्यामधलें
कोमल तनुला तृण खुपलें ? ४

काय येथलें दाणापाणी
सेवुन सेवुन मन विटलें ? ५

नंदनवनिंच्या दिव्य सुखांस्तव
आतुर इतुकें कां झालें ? ६

येइल परतुन आता कोठुन
कितिही अश्रू जरि गळले ? ७

# दिव्य भवितव्य

[ मुक्तछंद ]

सूक्ष्म हवेहून, दीप्त तेजाहून,
चित्सरिता वाहे अथांग, उद्दाम !
कोठून ती कोठे फेसाळत जाते–कळे कवणातें ?
–तिचें तिजलाही कळून न येई !

सरिता वाहते अनंततेमधे अनंत होऊन :
मानव तियेंत भोवंडे घेतात–तडफडतात–!
चंद्रसूर्यादिक विशाल, विलोल गगनींचे गोल
भिरभिरतात–गरगरतात–प्रवाहाभीतरीं !
उरतसे काय सर्व विश्वांतरीं अणु एक तरी सरितेबाहेरी ?

सरितेचें ऐसें रूप भव्य, दिव्य
मानवा ! करी का तुज भयाकुल–विस्मयविव्हल ?
नको, सरितेचें नको आराधन –
नको प्रवाहांत पुष्पसमर्पण–दीपविसर्जन—!
चिन्मय असून ती प्रज्ञाविहीन–ती संज्ञाविहीन–!
भरली तियेंत सारीच 'नेणीव' !– कोठली जाणीव ?
करुणा भाकून कणव येई न,
–अवमानूनही क्षुब्ध नच होई !

—कशाला स्फुंदणें ?—कशाला क्रंदणें ?

आहे घडायची त्वत्करीं प्रज्ञेची नौका नवलाची
डोलकाठी उंच भेदून जाईल गगनमंडळ !
मदभरें नौका डोलत चालतां—चालत डोलतां
क्षण शशांकाला क्षण रोहिणीला तिची डोलकाठी
स्पर्शितां उठेल मग परस्पर शशांकचुंबन रोहिणीच्या ओठीं !
—ऐशा नौकेलागी सरितेचें पडे कशाचें साकडें ?
सरितेवरती मात केल्यावीण ती राही कोठून ?
कां तूंही तियेंत तडफडशील—धडपडशील ?

—आहे तुझें दिव्य ऐसें भवितव्य !

---

# स्वप्नमंदिर

[ छंद-निर्झरगति ]

देवदूत : पहा ! अद्भुत    कवे ! मंदिर
सुंदर किती !

कवि : —सुंदर फार !—
आकार छान,    रचना छान,
कारागिरीने    हरतें भान !
हिंदु मंदिर,    बौद्ध मंदिर,
पैगंबरी वा    ख्रिस्ती मंदिर,
—यांत रचना    विशेष जी जी
ती ती आणिली    मंदिरामाजी !
सर्व धर्मांच्या    अनुयायांना
वाटावा त्यांत    आपलेपणा !

देवदूत : —कवीच खरा !—    पुरें वर्णन !
आंतलें कधी    घेशी बघून ?
अद्भुततर    सारें आंतील !
निववी नेत्र !

कवि —कोण नवल !—
गाभाऱ्यामधे    धवधवीत
सुवर्णासन    रत्नजडित,

छत्र सोन्याचें वरी शोभतें
हिऱ्यामोत्यांची झालर त्यातें !
–विचित्र किती !– आसनावरी
फावडें, विळा प्रतिमांपरी !
हेच का देव नव मंदिरीं ?
पूजनीय का ते खरोखरी ?
त्यांसच काय वंदावें जनीं ?
भूषवावें का त्यांस सुमनीं ?
नकळे कांही ! मन बावरे !
असेल यांत दूता ! काय रे ?

देवदूत : नव युगाची नव तेजाची
पहाट आता फुटावयाची !
नवयुगाचें नवीन वारें,
नवयुगाचे नवे पसारे !
नवयुगाचे नवीन देव,
जुनाच जरी भक्तीचा भाव !
'**श्रमलक्ष्मी**' ही देवी उद्याची
–फावडें, विळा प्रतीकें तिचीं !
परिस कवे ! परिस कानीं
गंभीर होई आकाशवाणी :
"या रे या सारे नव मंदिरीं
त्रसें मी नव्या मूर्तीमाझारी !

विश्वधर्माचें मंदिर धाम
विश्वशांतीचा तेंच उगम ! ” ४०

[ अनुष्टुभ् ]

जाग आणी नभोवाणी : स्वप्नजाल तदा विरे :
देवदूत कुठे ?—कोठे दिव्य मंदिर तें बरें !
अर्थ कांही असे स्वप्नीं ?—की तें आहे निरर्थक !
असो कांही ! स्मरे चित्तीं नित्य हें स्वप्नकौतुक !

# टीपा

[ 'आराधनें'त इ. स. १९२४–३४ या दशकांतील कविता स्थूल मानाने घेतल्या आहेत. अलीकडील कवितांचा स्वतंत्रच संग्रह निघेल. कविता कालानुक्रमाने दिल्या आहेत. बहुतेक कविता मुद्रित आहेत.

स्मरणांतून न सुटलेल्या कवितांचे मूळ आधार दिले आहेत. कदाचित् एखाद–दुसरी कविता वगळली गेली असण्याचा संभव आहे. तरी गैरसमज न व्हावा. तसेंच, कित्येक कवितांवर किरकोळ बाबतींत परकृतीची छाप पडली असणेंही शक्य आहे. मात्र साम्य=अनुकरण हें समीकरण सदैव खरें ठरत नाही !

कवितांचीं वृत्तनामें ('वृत्त' शब्द 'Metre' या व्यापक अर्थी वापरला आहे) 'छंदोरचने'च्या द्वितीयावृत्तीवरून घेतलीं आहेत. ]

'**वेड ग खपुष्पाचें**'–'खपुष्प' शब्द मिळावयास कठीण अशा वस्तूचें प्रतीक म्हणून वापरला आहे. त्याचा 'अजीबात अस्तित्वांत नसलेली वस्तु' असा अर्थ येथे घ्यावयाचा नाही.

'**कपटवेष**'–या नाट्यकाव्याचें कथानक काल्पनिक आहे. फक्त मागन्दिय ब्राह्मणकन्येच्या–'विभावरी'च्या–विवाहपूर्व वृत्तांतास बौद्ध-वाङमयामध्ये आधार आहे.

या कवितेंत मध्ययति तेवढे पाळले असून किरकोळ यतींना फाटा दिला आहे. 'छंदोरचना'कार प्रो. मा. त्रि. पटवर्धन यांनी या प्रकारास पृच्छेवरून खाजगी पत्राच्या द्वारें संमति दिली आहे, एवढेंच नव्हे, तर अनेक स्थळीं छंदोदृष्टया दुरुस्तीही सुचविल्या आहेत, या गोष्टीचा साभार निर्देश करणें जरूर आहे.

**पा. २८, ओ. १६९**–'यौगंधरायण' हा भासाच्या 'स्वप्न-वासवदत्ता' इ० नाटकांत येणारा उदयनाचा चतुर प्रधान होय.

**पा. ३०, ओ. १७**–'उपोसथ–दिन'=अष्टमीस येणारा बौद्धांचा एकादशीसारखा पवित्र दिवस.

**पा. ३२, ओ. २३६**–'सरस्वती' ही राजगृहाजवळची नदी व तपोदा' हा उष्ण पाण्याचा प्रवाह.

**पा. ४२, ओ. ४३७**–उदयनाने गौतम बुद्धाच्या हयातींत त्याच्या आकाराची चंदनी मूर्ति खरोखरच बनविली होती.

'**चिवचिव**'–या कवितेसारख्या ज्या कवितांचे छंद वा जाति 'छंदोरचने'च्या द्वितीयावृत्तींत आलेले नाहीत, त्यांचे छंदोलेख अगर मात्रालेख टीपांत दिले आहेत.

या कवितेचा छंदोलेख असा :

॥ भुलशी कां । आपुल्या । लेकराला ? ॥
(४) (३) (४)

'**माझिया जिवा !**'–छंदोलेख असा :

॥ भंगलेल्या । कैचा कुंभां–। त ॥
(४) (४) (१)

चतुर्थ चरण ॥ ४ । १ ॥ असा येतो.

'**आवाहन**'–छंदोलेख असा :

॥ मंदिर–देवते ! ॥
(६)

'गवती फूल' याच छंदांत आहे.

'**पूजिका**'–छंदोलेख असा :

॥ पूजापात्र हातीं । घेवोनिया धाईधाई ॥
(६) (८)

'कपटवेषा'प्रमाणें याहि कवितेंत फक्त मध्ययति पाळले आहेत.

'विश्वोत्पत्ति'–दुसऱ्या वाणीच्या गीताचा छंद 'गजवदन' व तिसऱ्या वाणीच्या गीताचा छंद किंचित् फेरफाराने 'वंशमणि' हा आहे.

पहिल्या व चौथ्या वाणीच्या गीतांचा छंद एकच आहे. प्रथम चरणाचा छंदोलेख असा :

॥ दिव्य स्वरांनो ! । दिव्य भावांनो ! । व्हा रे सन्मुख ॥
(५) (५) (५)

'सोहाग–रात'–या हिंदी शब्दाचा 'पति–पत्नीच्या मीलनाची प्रथम रात्र' असा अर्थ आहे.

कथानक टॉडच्या राजस्थानवरून घेतलें आहे.

'अनलज्वाला'–रा. व्यं. शं. वकील यांच्या 'यक्षकन्या' छंदासारखा हा अष्टमात्रिक आवर्तनांचा मुक्तछंद आहे. चरणांत ठरीव आवर्तनें येत नाहीत.

'तोच गीत पेकितो !'–रॉबर्ट ब्रिजेसच्या 'Nightingales' वरून हें संवादकाव्य लिहिलें आहे.

यांत 'बुलबुल' शब्द इंग्रजी 'Nightingale' शब्दाचा मराठी पर्याय म्हणून वापरला आहे. हें पटल्यास मग आठव्या पंक्तीबद्दल फारशी तक्रार करण्याचें कारण उरत नाही ! 'चेंबर्स सायक्लोपीडिआ' मधील पुढील अवतरण पहा:

" The nightingale usually begins its song in the evening and sings with brief intervals throughout the night "

'देवमान्य'–माझे रसिक मित्र कै. वि. रं. साकळे यांच्या

वाचनांत आलेल्या एका इंग्रजी कवितेवरून ही काव्यकथा त्यांच्याच सूचनेप्रमाणें लिहिली आहे.

**'पऱ्यांची नगरी'**–प्रतिचरणीं एक वा अधिक अष्टमात्रिक आवर्तनें येऊन शिवाय कांही चरणांत विरामाचें षण्मात्रिक आवर्तनही येतें.

प्रथम चरणाचा मात्रालेख असा :

॥ प । प । भृ ॥

**'नंदनवन मुकल्यावर'**—या संवादकाव्याचें संविधानक फेरफाराने हिंदी लघकथालेखक 'सुदर्शन' यांच्या 'संसारकी सबसे पहिली कहानी' या नवीन धर्तीच्या लघुकथेवरून आणि त्याचें तंत्र मॅडिसन ज्युलियस कॉवीनच्या 'The Watcher on the Tower' या कवितेवरून घेतलें आहे. अखेरचा 'विरामक' मात्र स्वतंत्र आहे.

या संवादकाव्यावर प्रि. प्र. के. अत्रे ('उपहासिनी') व रा. अनंत काणेकर ('महाराष्ट्र-शारदा') यांनी सुन्दर विडंबनकाव्यें लिहिलीं आहेत.

**'मनीषा'** व **'बुद्धाच्या अस्थींस'**–चीन व जपान यांमधील मंचुरियासंबंधींच्या एका जुन्या भानगडीवरून या कविता सुचल्या. दुसरी कविता याच सुमारास पाहिलेल्या एका स्तूपावरून सुचली.

उत्तरोक्त कवितेचा छंदोलेख असा :

॥ स्तूप येथे । दिसतो डो– । ळां ॥
(४) (४) (१)

**'दिव्य भवितव्य'**–प्रतिचरणीं एक वा अधिक षडक्षरी आवर्तनें घेतात. प्रथम चरणाचा छंदोलेख असा :

॥ सूक्ष्म हवेहून, । दीप्त तेजाहून, ॥
(६) (६)

# प्रथम चरणांची सूची

# शुद्धिपत्र

[क्वचित् उडालेले अनुस्वार, काना, मात्रा व रेफ शुद्धिपत्रांत समाविष्ट केले नाहीत. तसेंच चुकीने तोडून छापले गेलेले शब्दहि दुरुस्त केले नाहीत.]

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १४ | ८ | छबि | छवि |
| २० | ६ | महादेवीचि | महादेवीच |
| २२ | ५२ | वर्तुन | वर्तून |
| २४ | ९० | कां म्हणावी ! | कां तुझी म्हणावी ! |
| २६, ३१ | १३३, २२७ | कशी | कैशी |
| ३२ | २४६ | शंगार | शृंगारच |
| ३३, ३४ | २६०, २८० | ऱ्हदीं | ह्रदीं |
| ३४ | २८२ | अचेतनांचें | सचेतनांचें |
| ४० | ४१३ | येउन | येऊन |
| ४२ | ४३३ | वेषांतराचा | रूपांतराचा |
| ,, | ४४२ | भगवान् | भगवन् |
| ४४ | ४ | विसरलाशी | विटलाशी |
| ५३ | २४ | मंदिरा | मंदिरावरी |
| ७२ | ७ | जयगीति | जयगीती |
| ८३ | १४१ | करूं | करुं |
| १०३ | १३ | कटक कुंठले | कंटक कुठले |
| १०५ | ८ | लोटून | लोटुन. |